अनुभवलहरी : लहर दुसरी



# समाधीचे विविध प्रकार : मुख्य समाधि कोणती

लेखक

मंगेश रामचंद्र टाकी ऊर्फ दादाभाई

पंडित श्रीपाद दामोदर सातवळेकर
( गीतालंकार, साहित्य—वाचस्पति )
ह्यांची प्रस्तावना

पॉप्युलर बुक डेपो, मुंबई ७



मूल्य एक रुपया

## ती. गुरुवर्य श्रीरामचंद्र शंकर टाकी ऊर्फ श्रीभाई



— नेहमींच्या सहजस्थितीचें छायाचित्र —

[ एका महाशिवरात्रीस जोगेश्वरी येथील श्रीरामेश्वरावर झालेल्या
'एकादशणी' नंतर लगेच घेतलेलें छायाचित्र ]

श्री परमहंस दक्षिणेश्वर, कलकत्ता



## भावावस्था अथवा भावसमाधि

" भावावेशांत शरीरज्ञानाचा पूर्ण लोप झाल्यामुळें त्यांचे हात, पाय, मान वगैरे भाग वांकडे तिकडे होऊन जात व कधीं-कधीं तर सारें शरीरच हालूं लागून हे आतां पडतात कीं काय असें वाटे ! म्हणून अशा वेळीं जवळपास असलेली भक्तमंडळी, हे त्यांचे वेडेवांकडे झालेले अवयव हळुहळू जसेच्या तसे करीत व ते पडूं नयेत म्हणून त्यांना नीट धरून ठेवीत !! "

—कै. ना. रा. परांजपे

श्रीरामचंद्र शंकर जोगेश्वरी मुंबई



॥ श्रीसद्गुरुभ्यो नमः ॥



# समर्पण

योगिराज श्रीसोहिरोबानाथ आंबिये यांच्या —

" म्हणे सोहिरा गैबिनाथ हा माझे हृदयीं घुसून ।
जनांसि उद्धरावया कारणें वचन सांगतो ठसून ॥ "

या व श्रीसमर्थांच्या —

" जया अंतरीं भगवंत । अचल राहिला निवांत ।
तो स्वभावें जें बोलत । तें ब्रह्मनिरूपण ॥ "

या वचनोक्तीप्रमाणें परमपूज्य पिता व सद्गुरु **श्रीरामचंद्र शंकर टाकी** ऊर्फ **श्रीभाई** यांनीं संप्रेरिलेला (तुझा अंतरीं प्रवेश असे। म्हणोनि हेही स्फूर्ति प्रकाशे ॥—नारायण महाराज) व त्यांच्याच कृपाप्रसादें छापून प्रसिद्ध होत असलेला हा ग्रंथ त्यांच्याच दिव्य चरणीं अति नम्रभावें अर्थात् सर्वात्मभावें समर्पण करून व पुढील प्रार्थना सादर करून विलीन होतों :—

" जसी पक्षिणी पक्षहीनां पिलांतें । मुखीं अन्न घालोनि रक्षी सदां ते ॥
जसी अंडजां रक्षि ते पंखमात्रें । उबेनें तिच्या येत हीं सर्व गात्रें ॥१॥
तुवां ' ईक्षणें ' दिव्य जो बोध आम्हां । दिला तोचि पाळोनि सीताभिरामा ॥
करीसी विपाका तसी देवदेवा । कृपें मागुतीं घेईं हे पादसेवा ॥ २ ॥ "

श्रीमहाशिवरात्री
शक १८७४
दि. १२-२-१९५३

श्रींचा आज्ञांकित,
**मंगेश रामचंद्र टाकी**

## "गुरूचें भजन हेंच माझें ज्ञान – हेंच माझें ध्यान"

### ( पद )

गुरूचें भजन हेंचि माझें ध्यान ।
तेंचि पूर्ण ज्ञान जाण माझें ॥ ध्रु० ॥
माझा मायबाप सद्गुरु सांवळा ।
बहूत कोंवळा मजलागीं ॥ १ ॥
सद्गुरुचे पाय हेचि माझी यात्रा ।
तयावीण क्षेत्रा नेणें मी हो ॥ २ ॥
तोचि माझा देवो सर्वांचा गोसायी ।
रमावल्लभपायीं दास पूर्ण ॥ ३ ॥

## "हाचि परमानंद हेचि योगसिद्धी । लय लक्ष समाधि चरण तुझे ॥"

### ( अभंग )

विचारितां सहज कोणी नव्हे माझें ।
म्हणोनि चरण तुझे दृढ धरिले ॥ १ ॥
हेचि माझें ज्ञान हाचि गुरुमंत्र ।
व्रत तप तीर्थ चरण तुझे ॥ २ ॥
हेचि माझी क्रिया हेचि माझें कर्म ।
हा माझा स्वधर्म चरण तुझे ॥ ३ ॥
हेचि माझी पूजा हे माझें पूजन ।
ध्याईन तुझे चरण हृदयकमळीं ॥ ४ ॥
हाचि परमानंद हेचि योगसिद्धी ।
लय लक्ष समाधि चरण तुझे ॥ ५ ॥
नामा म्हणे मनें मानिला निर्धार ।
तरला भवसागर याची परी ॥ ६ ॥

# " मुख्य समाधि गुरुभजन "

## ( १ ) श्रीएकनाथी भागवत —

एक निर्विकल्प समाधि । जे कीं निरीह स्थिति निरवधि ।
तेणेंचि राहावें परमानंदीं । तेचि अवधि परमसुखाची ॥
तैसें न करितां समाधान । करावें सद्गुरूचें वर्णन ।
वाखाणावें ऐश्वर्य पूर्ण । हेंचि समाधान निर्विकल्प ॥
निर्विकल्पीं जे आनंदप्राप्ति । तेचि सद्गुरूवर्णनीं वर्ते स्थिति ।
याहूनि येथें सुखोपायगति । प्रयास न लगती योगाचे ॥
योगाचेनि बळेंकरून । करावें निर्विकल्प समाधान ।
निरोधोनि इंद्रियादि मन । स्वरूपस्थ पूर्ण करावें ॥
हे सर्व न करितां आटाआटी । मनोवृत्ति न करोनि उफराटी ।
सद्गुरूदर्शनेंचि सुखकोटी । वर्णनीं भेटी परमानंदाची ॥
सद्गुरूचें ऐश्वर्य वर्णितां । लाभे आपुली निजात्मता ।
नलगे त्यजणें इंद्रियार्थां । इंद्रियें सर्वथा कोंडणें नलगे ॥
अहो सर्वत्र असे जें सर्वपणें । त्यालागीं कासया समाधि करणें ।
उघड्या नेत्रींच भोगणें । नलगे घालणें आसनादिक ॥
जे सर्वत्र स्वरूप न देखती । जे स्वयें ब्रह्म जाले नसती ।
साधकपणें आपण देखती । तयांसि प्राप्ति समाधि साधनें ॥
अथवा सर्व जिहीं ब्रह्म देखिलें । स्वयें ब्रह्म असती जाले ।
परी दुःखदर्शनासि भ्याले । म्हणोनि निराले निर्विकल्पें ॥
येरव्हीं सर्वत्र जें ब्रह्म देखती । स्वयेंहि ब्रह्म जाले असती ।
तें सविकल्पें निर्विकल्पें राहाती । किंचिदर्थीं नव्हती न्यून ॥
ब्रह्मचि स्वयें जाले आपण । तेथ ब्रह्माहूनि अधिक कोण ।
ब्रह्म ब्रह्मेंसि तरी नव्हे न्यून । तें परिपूर्ण सर्वावस्था ॥
यालागीं जे जे अवस्थे राहिजे । ते ते ब्रह्मत्वेंचि असिजे ।
तेथें न्यूनाधिक काय बोलिजे । ब्रह्मचि सहजें नित्यरूपें ॥

यालागीं तो निर्विकल्प असो । अथवा सत्कर्माचरणीं वसो ।
सविकल्पें अथवा उगाचि बैसो । परी गुरुभजनीं पैसो बुद्धि त्याची ॥
तऱ्ही हाचि हा सर्वत्र आपण । करणीं अकरणीं नव्हे न्यून ।
म्हणोनि मुख्य समाधि गुरुभजन । तेंचि आपण सर्वदा करी ॥

## ( २ ) श्रीवामनपंडित – नामसुधा —

गुरुमुखें कळली स्वचिदात्मता, तदुपरांतिक जो गुरुदेवता ।
उभयभक्ति निजात्मपणें करी, सकळ होय कृपा गुरुची तरी ॥
आत्मानात्मविवेक मात्र गुरुच्या तेव्हां कृपेनें कळे,
जीवेशैक्य उपाधितें निरसितां शिष्यास तें आकळे ।
देवीं आत्मगत प्रियत्व उमजे तैसें गुरूचे स्थळीं,
ऐसी भक्ति करीत चित्तलहरी, तेव्हां मुरे चिज्जळीं ॥
चित्ताची लहरी चिदंबुधिजळीं त्याची मुरे जेधवां,
चैतन्यास जडांत तंतु वसनीं देखे असें तेधवां ।
ज्ञानाचा परिपाक होय, परि हें सर्वात्मभावीं जयीं,
भक्ति श्रीगुरुदेवपादकमळीं याची ठसावे तयीं ॥

## ( ३ ) श्रीवामनपंडित – भक्तिमाहात्म्य —

सहज ऐक्य कळोनिहि, मागुती घडि घडी तुज भक्तिच मागती ।
जसि पितां अमृता न पुरे धणी, निकट दास्य, असे तरि तूं धणी ॥
फुटोनी जयीं पांख ये शक्ति पक्षीं, न मातेस मानील तो गोड पक्षी ।
क्षणीं वीसरें पक्क मी भक्तियोगा, जळो पक्कता ते मला तों नयो गा ॥
जयीं शक्ति पक्षीं पिल्यांच्या निघाली, न माता मुखीं अन्न आणोनि घाली ।
क्षणी क्षांकिसी पक्क होतां कृपा हे, जळो पक्कता ते तिला कोण पाहे ? ॥
पिलूं माउलीलाची सर्वत्र पाहे, मुखीं अन्न तें माय घाली कृपा हे ।
पुढें हा न ही शून्यही भाव राहे, जळो पक्कता इंदिरेच्या वरा ! हे ॥

## ( ४ ) श्रीकेशवस्वामी – सद्गुरुस्तोत्र —

मज करणें कांहींच नाहींच उरलें । गुरूभक्तांचीं वंदीन पाउलें ॥ ध्रु० ॥
गुरूरायाचे पदक्षेत्रवासी हो । सर्वभावें होईन त्यांची दासी हो ॥ १ ॥
गुरूभक्त नांदती जया देशीं हो । तो मी देश ध्याईन अहर्निशीं हो ॥ २ ॥
गुरूभक्तांच्या आश्रमीं राहीन । सर्वही सुखाचें निजफळ लाहीन ॥ ३ ॥
गुरूभक्तीचा कुळधर्म ज्यांच्या घरीं । त्यांची मूर्ती मी पूजीन अंतरीं ॥ ४ ॥
गुरूवेगळें दैवत ज्यासी नाहीं हो । म्हणे केशव शरण त्याचे पायीं हो ॥ ५ ॥

## ( ५ ) श्रीरंगनाथी योगवासिष्ठ —

रजतमगुण सत्त्वेंकरुनि । जिंकावे गा भरंवसेनी ।
सत्त्वगुणही उपशमउनी । लीन निर्वाणीं करावा ॥
परी इतुकेही क्लेश न करितां । येकयेकाचे जयीं न लगतां ।
येकेचि काळें जय समस्तां । प्रयास नव्हतां होय तें सांगूं ॥
तरी भावें धरितां सद्गुरुचरण । भक्तीनें करितां अनन्य भजन ।
सर्वांचा जय होये संपूर्ण । नाहीं अनुपाये येथें ॥
कांहीं न करितां क्लेशसाधन । आनायासें सर्वांचा जयो जाण ।
येक सेवितां सद्गुरुचरण । लाभ पूर्ण पूर्णत्वाचा ॥
अहो वास्तव तरी विचारितां । भजनीय कोण सद्गुरूपरता ।
जो कीं ज्ञानदीप प्रकाशिता । जीवा तारिता ब्रह्मपणें ॥
साक्षात् सद्गुरु ब्रह्ममूर्ति । तोचि भजनीय गा सर्वार्थीं ।
तेथें असत्य बुद्धि करूनि मूढमती । अन्य पूजिती अन्योपायें ॥
सद्गुरूवेगळें देवतांतर । पूजणें जाण तो व्यभिचार ।
स्वपुरुष टाकूनि परनर । भजे गव्हार पुंश्चली जैसी ॥
सद्गुरूची कृपा तयासी । फळली नाहीं निश्चयेंसी ।
ययालागीं तो भक्तीसी । विमुख सर्वांशीं रामचंद्रा ॥
तयाचें जें श्रुतजात । तें व्यर्थचि जालें गा समस्त ।
कुंजरशौच बोलिजेत । धुतला घालित धूळ मागुती ॥

तैसें जें जें तो पढिन्नला । श्रुत्याध्ययनाचा अभ्यासु केला ।
महावाक्याचा विचारमेळा । व्यर्थ गमाविला गुरुभजनेंविण ॥
यालागीं सद्गुरूसि होऊनि शरण । येकांत भक्ती करावें भजन ।
तेणें सांगितलें मार्गेंकरून । मन संपूर्ण जिंकावें ॥

## (६) श्रीसमर्थ–दासबोध—

श्रीरामकृष्ण आदिकरुनि । अति तत्पर गुरुभजनीं ।
सिद्ध साधु आणि संतजनीं । गुरुदास्य केलें ॥

## (७) श्रीनारायण महाराज (जालवणकर)–गुरुपादुकाष्टक—

ज्या संगतीनेंच विराग झाला । मनोदरीचा जडभास गेला ।
साक्षात् परात्मा मज भेटवीला । विसरूं कसा मी गुरुपादुकांला ॥१॥
सद्योगपंथें घरिं आणियेलें । अंगेंच मातें परब्रह्म केलें ।
प्रचंड तो बोधरवी उदेला । विसरूं कसा मी गुरुपादुकांला ॥ २ ॥
चराचरीं व्यापकता जयाची । अखंड भेटी मजला तयाची ।
परंपदीं संगम पूर्ण झाला । विसरूं कसा मी गुरुपादुकांला ॥ ३ ॥
जो सर्वदां गुप्त जनांत वागे । प्रपन्न भक्तां निजबोध सांगे ।
सद्भक्तिभावाकरितां भुकेला । विसरूं कसा मी गुरुपादुकांला ॥ ४ ॥
अनंत माझे अपराध कोटी । नाणीं मनीं घालुनि सर्व पोटीं ।
प्रबोध करितां श्रम फार झाला । विसरूं कसा मी गुरुपादुकांला ॥५॥
कांहीं मला सेवनही न झालें । तथापि तेणें मज उद्धरीलें ।
आतां तरी अर्पिन प्राण त्याला । विसरूं कसा मी गुरुपादुकांला ॥ ६ ॥
माझा अहंभाव असे शरीरीं । तथापि तो सद्गुरू अंगिकारी ।
नाहीं मनीं अल्प विकार झाला । विसरूं कसा मी गुरुपादुकांला ॥७॥
आतां कसा मी उपकार फेडूं । हा देह ओंवाळुनि दूर सोडूं ।
म्यां एकभावें प्रणिपात केला । विसरूं कसा मी गुरुपादुकांला ॥ ८ ॥
जया वाणितां वाणितां वेदवाणी । म्हणे 'नेति नेती'ति लाजे दुरूनी ।
नसे अंत ना पार ज्याच्या रुपाला । विसरूं कसा मी गुरुपादुकांला ॥९॥
जो साधुचा अंकित जीव झाला । त्याचा असे भार निरंजनाला ।
नारायणाचा श्रम दूर केला । विसरूं कसा मी गुरुपादुकांला ॥ १० ॥

# अनुक्रमणिका







“ गुरुचरणींचा वासी रे !,
समाधि त्याची दासी रे ! ”

## पद

संतसमागम काशी रे ! । क्षणभर वस्तिशि जाशी रे ! ।
हरती पातकराशी रे ! । पावशि ब्रह्मपदासीं रे ॥ ध्रु० ॥

गुरुचरणीं मन ठेवुनियां । भजन रसायण सेवुनियां ।
चिन्मय लेणें लेउनियां । राहसि तन्मय होउनियां ॥ १ ॥

गुरुचरणींचा वासी रे ! । समाधि त्याची दासी रे ! ।
पदोपदीं त्या काशी रे ! । बोले केशव जोशी रे ! ॥ २ ॥



# समाधींची प्रस्तावना

श्रीसद्गुरु **मंगेश रामचन्द्र टाकी** ऊर्फ दादामहाराज यांनीं आपल्या कृपापत्रानें मला आज्ञापिलें कीं मी त्यांच्या '**समाधीचे विविध प्रकार: मुख्य समाधि कोणती**' या पुस्तकाला प्रस्तावना लिहावी; पण मला तर



**पंडित श्रीपाद दामोदर सातवळेकर**

समाधीचा अनुभव नाहीं. तेव्हां माहीत नसलेल्या विषयासंबंधानें मी कसें लिहूं ? असें मनास वाटलें व हें काम मजकडून होणार नाहीं असें मी सद्गुरुमहाराजांना

लिहिलें. तेव्हां त्यांनीं पुनः लिहिलें कीं ' प्रस्तावनेचें काम माझ्या इच्छेनुरूप आपल्याकडूनच उत्तम होईल अशी माझी मनोदेवता मला स्पष्ट ग्वाही देत आहे. विशेष लिहिण्याची जरुरी नाहीं. ' याचा अर्थ माझ्या लक्षांत आला नाहीं.

आज्ञेप्रमाणें हातांत लेखणी घेऊन बसलों, पण शब्दच सुचेना व लिहिण्यास प्रारंभ होईना. कांहीं सुचावें म्हणून ' समाधीचे प्रकार ' हें पुस्तक पुनः दोन वेळ वाचलें, कांहीं टिपणें केलीं, पण प्रारंभ कसा करावा तें समजेना. असे दोन तास गेले; तरी एकही शब्द लिहिला गेला नाहीं. इतक्यांत ध्यानाला बसावें अशी उत्कट इच्छा मनांत उद्भवली. माझी ध्यानाची वेळ सकाळीं ६ व संध्याकाळीं ७ अशी आहे. आज अवेळीं ध्यानास बसण्याची उत्कंठा कां होत आहे तें कळेना; पण इलाजच नव्हता. शरीरांत कंप सुरू झाल्यामुळें लेखन होणें शक्य नव्हतें. म्हणून ध्यानगृहांत जाऊन बसलों, तों जोरानें कंप सुरू झाला. हात, पाय व सर्व शरीर जोरानें कंपायमान होऊं लागलें. थोड्याच वेळांत कंप थांबला. शरीर शान्त झाल्यासारखें वाटलें. इतक्यांत मूलाधार चक्रापासून वरच्या बाजूला उड्डियानबंध होऊन अशी ओढ लागली कीं ती ओढ थांबवणें माझ्या स्वाधीन नव्हतें. हें सर्व आपोआपच होत होतें. शरीरावर माझा ताबा नव्हता. डोळे बंद होते व ते चिकटवल्यासारखे, पापण्या आंत ओढून बंद झाल्याप्रमाणें, बंद होते. ते उघडणें माझ्या शक्तीच्या बाहेरचें होतें. मूलाधारांतून वरच्या बाजूस होणारी ओढ मंजूळ आवाज गळ्यांतून निघून थांबत असे. असें चार पांच वेळ झालें. हें सर्व आपोआप घडत होतें. प्रथम मी हें थांबवावें यासाठीं प्रयत्न केला. पण तें थांबत नव्हतें. तेव्हां जें काय घडणार तें घडो, असें म्हणून मी स्वस्थ राहिलों. त्यानंतर असें ५।६ वेळ होऊन अगदीं स्वस्थ अवस्थेमध्यें शरीर झालें. यापूर्वी सात आठ वेळ प्रदीर्घ श्वासोच्छ्वास झाले. यापुढें काय झालें तें मला माहीत नाहीं. पण मी निद्रित नव्हतों. मी आहें असें वाटत असे. पुढें बऱ्याच वेळानें डोळे उघडले व चांगली जागृति आल्यावर घड्याळाकडे पाहिलें, तेव्हां सव्वा तास झाल्याचें समजलें.

या सव्वा तासांत मी कांहीं निद्रित नव्हतों, जागाही नव्हतों. शरीरावर माझा ताबा नव्हता. डोळे उघडणेंही मला शक्य नव्हतें. श्वास, प्रश्वास, कंप, मूलाधारांतील ओढ, त्यानंतरचा शब्द हें जें काय घडत होतें तें माझ्या प्रयत्नानें घडत नव्हतें. तें सर्व आपोआप होत होतें. ज्या क्रियांचें मला

स्मरण नाहीं अशा कांहीं क्रिया झाल्या कीं काय तें मला माहीत नाहीं. पण जागृतींत आल्यावर ज्याचें मला जशा क्रमानें स्मरण राहिलें त्याचें वर्णन मी तशा क्रमानें वर केलें आहे.

माझ्या ऐच्छिक प्रयत्नांशिवायही शरीराकडून कांहीं क्रिया घडतात. उदाहरणार्थ उड्डियानबंध प्रयत्नानें करण्यापेक्षां या वेळीं जो होता, त्यांत वर खेंचण्याची क्रिया विशेष जोराची असते. अशा स्थितींत जाण्याचा अनुभव मला गेल्या ४।५ वर्षांत आहे. केव्हां केव्हां ही स्थिति सहज येते. या अवस्थेंत जी स्थिति बनते, ती आपोआप बनते. गाढ निद्रेंत 'मी आहें' हें भान नसतें. या वेळीं तें असतें. निद्रेपेक्षांही अधिक प्रसन्नतेचा अनुभव या स्थितींत व या स्थितींतून जागृतींत आल्यावरसुद्धां कायम राहतो. अशा स्थितीचा अनुभव मिळूं लागल्यापासून मला असा अनुभव आला कीं शरीराला कळा लागल्या अथवा कोणताही भाग दुखूं लागला तरीही माझ्या मनाला त्या दुःखापासून क्लेश पोंचत नाहींत. शरीर निराळें आहे. हें दुःख त्याचें आहे. मी आनन्दस्वरूप आहें हें खरें आहे. ही स्थिति अधिकवेळ स्थिर राहिली तर ती मला इष्टच आहे, कारण यामुळें सुख-दुःख सम झाल्यासारखें मला वाटतें. दुःख नाहींच असा अनुभव येतो. तो बरा आहे यांत शंकाच नाहीं.

निर्विकल्प समाधि फार दूरचा पल्ला आहे. सविकल्प समाधि ही स्वतःच्या प्रयत्नानें होणारी आहे. तसा प्रयत्न मजकडून झालेला नाहीं. या स्थितीला 'प्रलय' नांव देतां आल्यास मला त्यांत कांहीं वाईट वाटण्याचें कारण नाहीं.

अनुभव खात्रीलायक घेतल्यावांचून समाधीवर लिहिणें अन्धानें सृष्टीचें वर्णन करण्यासारखें आहे. त्यापासून कोणाचाच लाभ होणार नाहीं. ध्यान करून सद्गुरूच्या ईक्षणानें, स्पर्शानें अथवा कृपेनेंही वरील अनुभव येतो हें खरें आहे. या अनुभवानें शरीराहून मी निराळा आहें हें अगदीं स्पष्ट होतें. श्री-सद्गुरु दादाभाईंनीं लिहिलेल्या '**समाधीचे विविध प्रकार**' या पुस्तकांत साधुसंतांनीं समाधीसंबंधानें जें लिहिलें आहे तें क्रमवार संग्रहीत केलें आहे. साधुसंतांचें लिखाण म्हणजे एक मोठा सागरच आहे. त्यांत पोहण्याचें सामर्थ्य सन्तांनांच असूं शकतें. श्रीसद्गुरु दादाभाई हे या सन्तवाङ्मय-महासागरांत आनन्दानें पोहणारे आहेत. "**सागरे सर्व तीर्थानि**" सागरांत अनेक रत्नें असतात. तीं सागरांत पोहणारांस व स्वेच्छेनें खोल शिरणारांसच प्राप्त होऊं

शकतात. आम्ही तर सागर पाहूनच भिऊन जातों. सध्यांच्या धकाधकीच्या दिवसांत सन्तवाङ्मयांतून इष्ट विषयांचीं वचनें निवडणें व तीं संगतवार जुळवणें हें अशक्यप्राय आहे. अशा वेळीं स्वतः सन्त असणाऱ्यांनींच हें कार्य मुमुक्षूंसाठीं करणें इष्ट व योग्य आहे. समाधि या कठीण व बहुतेकांच्या अनुभवांत न असणाऱ्या विषयासंबंधानें साधुसन्त आपल्या अनुभवाचे कोणते बोल बोलून गेले, हें जाणणें त्या मार्गानें जाणाऱ्यांस अत्यन्त उपयुक्त आहे. हें कठीण कार्य श्रीसद्गुरु दादाभाईंनीं करून हें पुस्तक या मार्गानें जाण्याचा प्रयत्न करणाऱ्यांसाठीं अत्यंत उपयुक्त असें बनविलें आहे. हें सर्व साधकांना मार्गदर्शक झाल्याशिवाय राहणार नाहीं.

या पुस्तकांत पुढील विषयांवरील संतवचनें आलेलीं आहेत. **प्रलय** अथवा **मूर्च्छासमाधि, अष्टभाव, समाधिसुखाचे अनुभव, शान्तावस्था, सहजसमाधि, ज्ञानपरिपाक.** यांवर इतकीं संतवचनें या ठिकाणीं दिलीं आहेत कीं, तीं वाचूं लागलें म्हणजे वाचणारा तल्लीन झाल्याशिवाय राहत नाहीं.

'समाधीसंबंधानें आधुनिक विद्वानांचीं भ्रान्त मतें' पृ. १० ते १२ पर्यंत दिलीं आहेत तींहीं वाचकांनीं पहावीं, म्हणजे भ्रांत समजुतीपासून त्यांस दूर राहतां येईल.

अशा रीतीनें हें लहानसें पुस्तक, अनुभवाचे संतांचे बोल यांत एकत्रीत झाल्यामुळें, साधकांना उत्तम मार्गदर्शन करणारें होईल यांत मला संदेह वाटत नाहीं. या पुस्तकानें मराठी भाषेंतील अध्यात्म वाङ्मयांत, हा नुसता वचनसंग्रह असला तरीही, भर पडलेली आहे. यासाठीं या पुस्तकाबद्दल मुमुक्षु, साधक लेखकाचे आभार मानल्याशिवाय राहणार नाहींत. म्हणून मुमुक्षूंनीं हें पुस्तक अवश्य वाचावें असें मी त्यांस या प्रस्तावनेच्या द्वारें सुचवीत आहें.

नम्र निवेदक

**श्री. दा. सातवळेकर**
**स्वाध्याय मंडळ, आनंदाश्रम,**
**किल्ला–पारडी, जि. सुरत**

संवत २००९
माघ वद्य ५ शके १८७४
४ फेब्रुवारी सन १९५३

# ग्रंथपरिचय

समाधीच्या खऱ्या स्वरूपाची कल्पना सामान्य जनांना तर सोडाच पण कांहीं विद्वज्जनांना व बहुश्रुत अशा हरिभक्तिपरायणांनांही बरोबर नसल्याचें दृष्टोत्पत्तीस आल्यामुळें, प्रस्तुतच्या प्रबंधरचनेचा योग घडून आला. ग्रंथ यापूर्वीच छापून प्रसिद्ध करण्याचा मनोदय असूनही, आतांपावेतों प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें, तो प्रसिद्ध होऊं शकला नाहीं, त्याबद्दल अत्यंत दिलगिरी वाटते. 'ईश्वरेच्छा बलीयसी!' आतां श्रीसद्गुरुकृपेनें प्रकृतिमान अंमळ सुधारत चालल्यामुळें, ग्रंथ-प्रकाशनाचें काम हातीं घेण्यांत आलें असून, तें सिद्धीस नेण्यास श्रीसद्गुरुराज समर्थ आहेत. असो.

श्रीवामनपंडित म्हणतात —

**"जरि मन विघरेना सेवितां विष्णुलीला ।**
**अकळचि महिमा तो निर्गुणाचा तयाला ॥"**

वरील श्लोकार्धांत पंडितांनीं ईश्वराचे गुण व लीला गाऊन ऐकून जर मन विघरत नाहीं — तें द्रवीभूत होत नाहीं — तर अशा मुमुक्षूस निर्गुणस्वरूपाचा साक्षात्कार होणें अगदीं अशक्य आहे, असा सिद्धांत प्रतिपादन केला आहे. हा साक्षात्कार सत्संगतींत श्रवण-कीर्तनादि भक्तीच्या योगानें होत असतो; परंतु असें श्रवण-कीर्तन आत्मनिष्ठ आचार्यांच्याच मुखानें झालें असतां अंतःकरण द्रवून त्यास प्रेमपाझर फुटतात. संतकवि श्रीअमृतराय पुढील सुप्रसिद्ध पदांत याचा खुलासा फार मार्मिक रीतीनें करतात, तो असा :—

**" तयांचे शब्द मनीं रुतले ॥ ध्रु० ॥**

**धनसुतदारा गृहही त्यजिलें । भगवंतीं रतले ॥ १ ॥**

**हरिगुण गातां प्रेमजळानें । सर्वांगीं धुतले ॥ २ ॥**

**सुखोद्गार ते ब्रह्मरसाचे । अमृत म्हणे सांचले ॥ ३ ॥ "**

अशा प्रकारें अंतःकरण अति निर्मळ, अति स्वच्छ, अति मृदु होऊन, जे अष्टभाव प्रगट होतात, ते येणेंप्रमाणें :—

**" स्तंभः स्वेदोऽथ रोमांचः स्वरभंगोऽथ वेपथुः ।**
**वैवर्ण्यमश्रुप्रलय इत्यष्टौ सात्त्विकाः स्मृताः ॥ "**

या भावांतील शेवटला जो ‘ प्रलय ’ त्यालाच ‘ मूर्च्छा-समाधि ’ ( Death-like Trance ) असें म्हणतात. अशा प्रकारची मूर्च्छा-समाधि लागून देहत्रयाचा निरास झाल्याशिवाय आत्मसाक्षात्कार होणें अगदीं अशक्य आहे, असें सर्व थोर संतविभूतींचें म्हणणें आहे. या अष्टभावांचा आरंभ अश्रुपातांत होत असल्यामुळें, श्रीवामनपंडित वर उल्लेखिलेल्या **‘ जरि मन विघरेना ’** या श्लोकार्धांत **‘ अकळचि महिमा तो निर्गुणाचा तयाला ’** असें जें स्पष्ट सांगतात, तें यथायोग्यच होय. कारण, असा अश्रुपात होणें ही अष्टभावांतील पहिली पायरी असून, देह निचेष्टित होऊन भूमीवर पडणें ही शेवटली स्थिति होय. अष्टभावांतील पहिलाच भाव जर प्रगट झाला नाहीं तर अखेरचा कोठून होणार ? आणि मग आत्मसाक्षात्काराचे प्रकार तरी आपल्याला कसे बरें पहावयास मिळणार ?

प्रस्तुत निबंधांत ह्या ‘ प्रलया’चा विचार अगदीं आरंभींच करण्यांत आला असून, तोच समाधितत्त्वाचा मूळारंभ होय ; कारण, त्याशिवाय अनुभवजन्य ज्ञान होणेंच अशक्य. मग समाधि व समाधीचे विविध प्रकार हे दूरच राहिले ! जर पर्वत सागरावर तरूं शकेल तर अंतःकरण निर्मळ न झालेला असा मुमुक्षु आपले रजतम घेऊन ( **काम क्रोध आड पडले पर्वत । राहिला अनंत पलीकडे ॥ नुलंघवे मज न सांपडे वाट । दुस्तर हा घाट वैरियांचा ॥** — तुकाराम महाराज ) भवसागर तरून पैलतीराला जाऊं शकेल ( **जो ‘ दुःख कां जालें ?’ म्हणूनी रडे । आणि ‘ सुख हो ’ म्हणोनी इच्छेंत बुडे । त्यासही जरी समाधि सांपडे । तरी स्वयें पर्वत तरे समुद्रांत ॥** — यथार्थदीपिका ) ; आणि म्हणूनच श्रीयोगवासिष्ठांत अनुभवजन्य ज्ञान प्राप्त करून घेण्याला शिष्याची प्रज्ञा म्हणजेच शुद्ध मति, शुद्ध अंतःकरण अगर शुद्ध सत्त्वच कारणीभूत आहे ( **ज्ञप्तेस्तु कारणं शुद्धा शिष्यप्रज्ञैव केवला ।** ), असें श्रीवसिष्ठमुनि स्पष्ट सांगतात.

‘ प्रलयाची ’ व्याख्या ‘ कल्याण योगांकां’त दिली आहे, ती अशी :—

**“ जहाँ शरीरका तथा भले-बुरेका ज्ञानही न रह जाय उसे प्रलय कहते हैं । इन्हीं सब कारणों से बेहोशी हो जाती है । इस अवस्थामें प्रायः लोग पृथिवीपर गिर पडते हैं । बेहोश होकर धड़ामसे पृथिवीपर गिर पडनेका नाम ‘ प्रलय ’ है ॥ ”**

यापुढें या अष्टभावांचें श्रीज्ञानेश्वरींत आलेलें वर्णन वाचकांनीं अवश्य वाचावें. ज्या श्रीमदाद्य शंकराचार्यांच्या भाष्याला धरून श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं आपली भावार्थदीपिका रचिली ( **तैसा व्यासाचा मागोवा घेत। भाष्यकारातें वाट पुसत। अयोग्यहि मी न पवत। कैं जाईन॥**— ज्ञानेश्वर ), त्या थोर आचार्यांचें या सात्त्विक अष्टभावांसंबंधीं काय म्हणणें आहे तें देण्यांत आलें असून, वाचकांचें लक्ष त्याकडे आम्हीं खेंचीत आहों ( ग्रंथ पृ० १ ते ४ पहा ).

यानंतर श्रीएकनाथ महाराजांचें खऱ्या समाधीचें वर्णन आलें असून खरी समाधि प्राप्त झाल्यावरही श्रीजनार्दनस्वामींसारखे थोर पुरुषही कसे मूर्च्छापन्न होतात, तें श्रीनाथ महाराज येथें असंदिग्धपणें सांगत आहेत.

खऱ्या समाधिसुखाचे संतांचे अनुभव ग्रंथाच्या आठव्या समासांत ग्रथित करण्यांत आले असून, नवव्यांत त्यासंबंधीं आधुनिक विद्वानांचीं कशीं गैरमतें बनलेलीं असतात हें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. पुढें ओघानेंच समाधि व सुषुप्ति यांतील भेदाचें स्पष्टीकरण करण्यांत आलें असून, तदनंतर बुद्धि समतोल असणें हीच खरी समाधि, ताटस्थ्य किंवा तटस्थता ही खरी समाधि नव्हे, हें आमच्याच परंपरेंतील सद्गुरु श्रीबलभीम महाराज साडेकर यांच्या एका पत्रांतील उतारा व इतर महत्त्वाचे उतारे देऊन सिद्ध करण्यांत आलें आहे. त्यानंतर बाराव्या समासांत सहजसमाधीचें स्वरूप कसें असतें याचा सविस्तर खुलासा अनेक संतवचनांधारें व वे० शा० सं० पावगीशास्त्री यांच्या 'योगवासिष्ठांतील तत्त्वज्ञान' या ग्रंथांतील उतारा देऊन करण्यांत आला आहे. हा उतारा महत्त्वाचा असल्यामुळें थोड्या विस्तारानेंच देण्यांत आला आहे व त्याबद्दल शास्त्रीबोवा उदार अंतःकरणानें आम्हांला क्षमा करतील, अशी आशा वाळगतों.

ग्रंथ पृ० २८ ते ३९ वर समाधीचे विविध प्रकार, समाधीचीं लक्षणें, समाधिस्थांची स्थिति आणि समाधि प्राप्त करून घेण्याचे सुलभ उपाय वगैरे, वगैरे मुद्द्यांसंबंधींची जी मीमांसा थोडी विस्तारानें करण्यांत आली आहे ती वाचकांनीं अगत्यपूर्वक वाचावी, अशी त्यांस विनंति आहे.

शांडिल्यसूत्रांत उल्लेखिलेल्या 'धर्ममेघसमाधी'चा खुलासा चौदाव्या समासांत विस्तृतपणें केला गेला असून, ज्ञानोत्तरभक्तीच्या म्हणजेच जीवन्मुक्त-

दर्शनंतरच्या पराभक्तीचें विशदीकरण प्रस्तुतच्या समासांत करण्यांत आलें आहे. या दृष्टीनें हें प्रकरण अत्यंत महत्त्वाचें झालें आहे, यांत संशय नाहीं. विषय अति गहन असून त्याबद्दल यथार्थ ज्ञान असलेले अनुभवी आजकाल विरळाच ! भगवान् श्रीगीतेंत स्पष्ट म्हणतात :—

**" मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये ।**
**यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः ॥ "**

ग्रंथाच्या अखेरीस थोडेंसें 'सिंहावलोकन' केलें आहे. या सदराखालीं जे अनेक थोर संतविभूतींचे अनुभव दिले आहेत, त्यांत त्या सर्व संतांना तटस्थतेचा अनुभव कांहीं काळ साक्षात्काराच्या स्थितींत आरंभीं अनुभवावा लागला, असें दिसून येईल. सकृद्दर्शनीं हे सिद्धांत जरी परस्परविरोधी दिसले तरी ते तसे नसून ते कसे बरोबर आहेत, हें अनेक सबळ आधार व बळकट प्रमाणें देऊन स्पष्ट करून दाखविण्यांत आलें आहे. वाचकांनीं हा विभाग वाचून आपली समजूत बरोबर करून घ्यावी ( ग्रंथ पृ० ४५ ते ५६ पहा ). येथें ओघानेंच सद्गुरूची सर्वात्मभावें जो सेवा करतो, त्याच्या ज्ञानाचा परिपाक होऊन तो कसा जीवन्मुक्त होतो याचें स्पष्टीकरण श्रीवामनपंडितांच्या 'नामसुधे' तील श्लोकाधारें करून दाखविण्यांत आलें आहे. हे श्लोक अत्यंत महत्त्वाचे असून, त्यांकडे वाचकांचें लक्ष विशेष खेंचावेसें आम्हांस वाटतें. तसेंच श्रीएकनाथी भागवतांतील ज्या अति बहारीच्या ओंव्या उद्‌धृत करण्यांत आल्या आहेत त्यांचें सार — " **यालागीं साक्षात् ब्रह्ममूर्ती । सद्गुरू होय निश्चितार्थीं । त्याचे दर्शनमात्रेंचि नाशती । चिदचिद्‌ग्रंथी संशयकर्में ॥** " ह्या एका ओंवींतच सांगतां येईल. यापुढें श्रीएकनाथ महाराजांनींच 'मुख्य समाधी'च्या स्वरूपाचें वर्णन फारच बहारीचें केलें असून 'मुख्य समाधि गुरुभजन' असा जो निष्कर्ष काढला आहे तोही अत्यंत मननीय आहे.

शेवटीं, समाधि लावण्याच्या खटाटोपींत असणाऱ्या साधकांनीं गुरूचरण-सेवेपरत्या कोणत्याही भानगडींत पडूं नये असें त्यांना मोठ्या कळकळीनें बजावून सांगण्यांत आलें आहे. '**मुख्य समाधि गुरुभजन**' या मथळ्याखालीं ग्रंथारंभीं जीं 'सुविचार-सुमनें' दिलीं आहेत त्यांची माला गुंफून गळ्यांत

परिधान केली असतां, त्याची फलश्रुति आद्यसद्गुरु श्रीनारायण महाराज जालवणकर यांच्या शब्दांत पुढीलप्रमाणें सांगतां येईल :—

**" घाली गळीं जो ' सुविचारमाला ' । होईल तो काळजवानिराळा ॥**
**आनंद भोगील निरंजनाचा । तो वाणितां मौन धरील वाचा ॥ "**

## आभारप्रदर्शन

प्रस्तुत ग्रंथाला प्रस्तावना लिहिण्याचें काम, स्वाध्याय-मंडळ, आनंदाश्रम, पारडी, येथील वयोवृद्ध, तपोवृद्ध व ज्ञानवृद्ध वे० शा० सं० पंडित श्रीपाद दामोदर सातवळेकर यांनीं पत्करलें असून, पंडितजींची या बाबतींतील विनयता अत्यंत अनुकरणीय आहे. पंडितजी हे भगवदुक्तीप्रमाणें–" **विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे** " कसे आहेत, हें त्यांच्याच पुढील वचनावरून स्पष्ट होत आहे :—

" . . . आपला ग्रंथ अनुभवाचा असतो. तेव्हां अनुभव घेतलेल्या आपल्या-सारख्यानेंच त्याची प्रस्तावना लिहिलेली बरी, असें माझें मत आहे. तथापि, आपली आज्ञा वंद्य आहे... "

या त्यांच्या विनयतेचा गौरव करावा तेवढा थोडाच आहे.

माझ्या सांप्रतच्या उतार वयांत व सद्यः प्रकृतीचे अस्वस्थ कालांत हातीं घेतलेलें प्रस्तुत ग्रंथाच्या छपाईचें काम, माझे भाचे चि० गोपाळराव नारायणराव पाटकर व चि० रमाकांत पाटकर या बंधुद्वयाकडून जें सहाय्य मिळालें तें मिळालें नसतें तर इतकें लवकर, एवढें बिनचूक व सफाईदार कधींच झालें नसतें.

हें जरी सर्वस्वीं खरें आहे तरी, आमचे प्रियबंधु श्री. वामनराव मंगळराव भोईर–ज्यांनीं छापखान्यासाठीं सुंदर हस्तलिखित-प्रत तयार केली–यांना विसरून चालावयाचें नाहीं. यांनीं ही प्रत नीटनेटकेपणानें जर लिहून काढली नसती, तर छापखान्यांतील कामगारांना इतकें बिनचूक व सफाईदार काम आम्हांस खचित देतां आलें नसतें. तरी या सर्वत्रांचें मी अंतःकरणपूर्वक आभार मानतों.

## समर्पण व प्रार्थना

असो. ज्या श्रीसद्गुरुमाऊलीच्या कृपाप्रसादें ही प्रबंधरचना घडून आली ती तिच्याच दिव्य चरणीं सर्वभावें समर्पण करतों व पुढील प्रार्थना सादर करून विलीन होतों :—

" घालीं पंखाखालीं सद्गुरु माऊली ।
करोनी साऊली कृपेचि गे ॥ १ ॥

लोटूं नको दूर पक्षहीन बाळां ।
येऊं दे कळवळा जननीये ॥ २ ॥

चंचुपुटें घालीं मुखांत कवळ ।
घेऊनि जवळ पाजीं पान्हा ॥ ३ ॥

नको ज्ञानवृद्धि परिपाक आम्हां ।
धेनु-वत्स-प्रेमा देईं देईं ॥ ४ ॥

मागों हेंचि दान देईं कृपामूर्ति ।
अखंडित प्रीति जडो पायीं ॥ ५ ॥ "

— श्रीमंगेशसुधा

मिति मार्गशीर्ष कृ. ११
शक १८७४
सद्भक्ति-मंदिर, जोगेश्वरी, मुंबई.

ग्रंथकार

॥ श्रीसद्गुरुभ्यो नमः ॥

# समाधीचे विविध प्रकार : मुख्य समाधि कोणती

---

'समाधीचें खरें स्वरूप' या शीर्षकाखालीं 'सद्भक्ति-प्रकाश †' वर्ष १५, संयुक्तांक ४–१२ मध्यें लेखमाला सुरू होऊन ती वर्ष १६, संयुक्तांक ४–६ मध्यें पुरी झाली. या लेखमालेंत समाधीसंबंधींची सर्व माहिती येऊन गेली आहे.

## ( १ ) प्रलय अथवा मूर्च्छासमाधि

खरी समाधि लागण्यापूर्वीं मूर्च्छागत समाधि, जिला इंग्रजींत 'Deathlike trance' म्हणतात, ती लागते. अष्ट सात्त्विक-भावांत* प्रलय किंवा चेष्टानिरोध हा शेवटला भाव असून हा प्राप्त झाल्याशिवाय, आत्मसाक्षात्कार होऊन खरी समाधि लागणें अगदीं अशक्य आहे. या अवस्थेंतून प्रत्येक तत्त्वजिज्ञासूला गेलेंच पाहिजे. ही 'प्रलया'वस्था प्राप्त झाल्यावर असा तत्त्वजिज्ञासु अगर

---

† हें त्रैमासिक असून यांत भक्ति-ज्ञान-वैराग्य-परिपोषक असेच विषय घेतले जातात. वार्षिक वर्गणी रुपये तीन. प्रकाशक : ट्रिनिटी पब्लिसिटी सोसायटी, श्रीशंकर लॉज, सरस्वती बाग, जोगेश्वरी, मुंबई.

* हे भाव येणेंप्रमाणें :— (१) स्तंभ (२) स्वेद (३) रोमांच (४) स्वरभंग (५) वेपथु (६) वैवर्ण्य (७) अश्रु (८) प्रलय (**स्तंभः स्वेदोच रोमांचः स्वरभंगोऽथ वेपथुः । वैवर्ण्यमश्रुप्रलय इत्यष्टौ सात्त्विकाः स्मृताः ॥**)

निचेष्टित‡ होऊन भूमीवर एखाद्या टोणप्यासारखा पडतो. या स्थितीचें वर्णन श्रीवामनपंडितांनीं यथार्थदीपिकेंत पुढीलप्रमाणें फार बहारीचें केलें आहे :—

**" शरणागतीचें लक्षण । प्रथम हें कीं आपण । कांहीं नेणें टोणपा अविचक्षण । सर्वज्ञ तूं मज उद्धरीं ॥ या भावें प्रणिपात । करावा प्रकर्षें शरीराचा निपात । तो दंडवत कीं अकस्मात । पडे जैसा टोणपा ॥ तो टोणपा ढकलितां पडों जाणे । परी पडला तो उठों नेणे । कीं मस्तकीं पद्महस्त बाणे । उठे प्रभावें तयाच्या ॥ अचेतन दंड पडला । तो टोणपा सचेतनें उचलिला । तैसा जडात्मत्व जाणणार याला । उचली कोण चिदात्मत्वें त्यावांचूनी ॥ "**

श्रीवामनपंडितांनीं या ओंव्यांत प्राणिपाताचें जें वर्णन केलें आहे तें वर उल्लेखिलेल्या ' प्रलयाला 'च निःसंशय अनुलक्षून आहे.

' कल्याण ' – योगांकांत या प्रलयावस्थेचें अर्थात् प्रणिपाताचें फार सुंदर वर्णन आलें आहे, तें असें :—

**" जहाँ शरीरका तथा भले-बुरेका ज्ञानही न रह जाय उसे प्रलय कहते हैं । इन्हीं सब कारणोंसे बेहोशी हो जाती है । इस अवस्थामें प्रायः लोग पृथिवीपर गिर पडते हैं । बेहोश होकर धड़ामसे पृथिवीपर गिर पड़नेका नाम ' प्रलय ' है ॥ "**

‡ आधारादाखल कांहीं महत्त्वाचे उतारे :—

**" नयनीं अश्रूंचा पूर लोटीं । उभंडू न संठेच पोटीं । होत जीवभावाची तुटी । पडे सृष्टीं मूर्च्छित ॥ "** — एकनाथ महाराज ; " या प्रेमाच्या पुराचा अतिरेक झाला कीं, भक्त निचेष्ट पडतो " ( When the flow of joy is too great, the Bhakta falls down in a swoon. — गौरांगप्रभु ) ; " प्रार्थना व भक्ति करतांना पैगंबराच्या नेत्रांतून सतत अश्रूंच्या धारा चालत असत. त्याचा चुलतभाऊ अली याचा देह तर प्रार्थनेच्या समयीं निचेष्ठ होई. " — महंमद पैगंबर.

## ( २ ) श्रीज्ञानेश्वरींत अष्टभाव

अष्ट सात्विकभावांचा उल्लेख आरंभीं झालाच आहे. श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं पुढील ओंव्यांत या भावांचें वर्णन उत्तम प्रकारें केलें आहे, तें असें : —

**"आंतु आनंदा चेइरें जाहलें । बाहेरि गात्रांचें बळ हारपोनि गेलें । आपाद पां गुंतलें । पुलकांचलें ॥ वार्षिये प्रथमदशे । वोहळलया शैलांचें सर्वांग जैसें । विरूढे कोमलांकुरीं तैसें । रोमांच जाहले ॥ शिवतला चंद्रकरीं । सोमकांतु द्रावो धरी । तैसिया स्वेदकणिका शरीरीं । दाटलिया ॥ माजि सांपडलेनि अलिकुळें । जळावरी कमळकळिका जेवीं आंदोळे । तेवीं आंतुलिया सुखोर्मीचेनि बळें । बाहेरि कांपे ॥ कर्पूरकर्दळीचीं गर्भपुटें । उकलतां कापुराचेनि कोंदाटें । पुलिका गळती तेवीं थेंबुटें । नेत्रौनि पडती ॥ उदयलेनि सुधाकरें । जैसा भरलाचि समुद्र भरे । तैसा वेळोवेळां उर्मी भरे । उचंबळत असे ॥ ऐसा सात्त्विकांही आठां भावां । परस्परें वर्ततसे हेवा । तेथ ब्रह्मानंदाची जीवा । राणीव फावली ॥"** ( अ. ११–ओं. २४६–५२ )

## ( ३ ) श्रीमदाद्य आचार्य व अष्टभाव

फार कशाला, श्रीमदाद्य शंकराचार्य या सात्त्विक अष्टभावांसंबंधीं 'प्रबोध–सुधाकरां'त ‡ काय म्हणतात पाहा : —

**( १ ) चित्ते सत्त्वापत्तौ तडिदिव बोधोदयो भवति ।**
**शुद्ध्यति नांतरात्मा कृष्णपदांभोज भक्ति ऋते ॥**

**( २ ) केनापि जीयमाने हरिगीते वेणुनादे वा ।**
**आनंदाविर्भावो युगपत् स्यात् अष्टसात्त्विकोद्रेकः ॥**

‡ Translation of the above three extracts from the '**प्रबोध–सुधाकर**' : —

( 1 ) " When the mind is overtaken by **सत्त्व** ( quality of goodness and purity ) the dawn of knowledge arises like a flash of

**तस्मिन् अनुभवति मनः प्रगृह्यमाणं परात्मसुखम् ।**
**स्थिरतां याते तस्मिन् याति मदोन्मत्तदंतिदशाम् ॥**
**( ३ ) जंतुषु भगवज्ज्ञानं भगवति भूतानि पश्यति क्रमशः ।**
**एतादृशी दशाचेत् तदैव हरिदास्यवर्यः स्यात् ॥**

या सात्त्विक अष्टभावांसंबंधीं पुनःपुन्हा एवढा खुलासा करण्याचें कारण त्यांतील शेवटला भाव जो 'प्रलय' त्याचें महत्त्व वाचकांच्या लक्षांत यावें, हेंच होय.

## ( ४ ) खऱ्या समाधीचें श्रीएकनाथ महाराजांनीं केलेलें वर्णन

प्रलयानें प्राप्त होणारी समाधि जरी खोटी असली तरी त्या स्थितींतून प्रत्येक तत्त्वजिज्ञासूला गेलेंच पाहिजे. यानंतर सद्गुरुमुखानें 'तत्त्वमसि'-वाक्याचा उपदेश झाल्यावर जी समाधि लागते ती खरी समाधि असून, तिचें उत्तम वर्णन *श्रीएकनाथी भागवतांत श्रीदत्तात्रेयांनीं श्रीजनार्दन स्वामींवर* केलेल्या अनुग्रहाच्या हकीगतींत आलें आहे, तें असें :—

**" देवो भावाचा भोक्ता। दृढ जाणोनि अवस्था। येणें जालें श्रीदत्ता। तेणें हातु माथा ठेविला ॥ हातु ठेवितांचि तत्काळ। बोधु आकळिला**

---

lightning. Without devotion to the lotus feet of Shri Hari, the internal mind or heart cannot be purified. "

( 2 ) " When a song of Shri Hari is chanted by some one or when the sound of a flute is heard, there appears instantaneously an abundance of eightfold external indications of emotional sentiments. In such a state the restrained mind enjoys the pleasure of the Supreme Soul. When the mind is properly composed and steady it reaches the state of an intoxicated elephant."

( 3 ) " Then the mind sees the Divine presence in all the creatures and sees all the creatures in the Supreme Spirit in due order. If such a state is reached, it is then only the aspirant or मुमुक्षु deserves to be called the foremost humble Servant of Shri Krishna."

सकळ । मिथ्या प्रपंचाचें मूळ । स्वरूप केवळ स्वबोधें ॥ कर्म करूनि अकर्ता । तोचि अकर्तात्मबोधु जाला देता । देहीं असोनि विदेहता । तेही तत्त्वतां आकळिली ॥ गृहाश्रमु न सांडितां । कर्मरेखा नोलांडितां । निजव्यापारीं वर्ततां । बोधु सर्वथा न मैळे ॥ तो बोधु आकळितां मना । मन मुकलें मनपणा । अवस्था नावरेचि जनार्दना । मूर्च्छापन्न पडियेला ॥ त्यासी सावध करूनि तत्त्वतां । म्हणे प्रेमा राहे सत्त्वावस्था । तोही गिळोनि सर्वथा । होयीं वर्तता निजबोधें ॥ ”

## ( ५ ) कु० प्रभावती सुळे यांच्या स्वात्मानुभवाचा खुलासा

सद्भक्ति-मंदिरांतील कु० प्रभावती सुळे यांचा अनुभव वरीलप्रमाणें असल्याचें त्यांच्या मुखांत घातलेल्या पुढील अभंगावरून स्पष्ट होत आहे :—

“ भाई कसें तुम्ही मज केलें । देहभान समुळही नेलें ॥ ध्रु० ॥
अष्टभाव हे प्रगटची होतां । क्षितीं निचेष्टित मी पडलें ॥ १ ॥
सुरतरु-चरणां शरणचि जातां । दंडवतचि मी झालें ॥ २ ॥
‘ ब्रह्म-विष्णु-महेश ’ वदतां । निजगृहीं कसें मी आलें ॥ ३ ॥
जीवा-शिवाचें ऐक्यचि होतां । जीवपणचि हें गेलें ॥ ४ ॥
अनुभव तेथिल सांगुं मी कैसा । जेथें मनचि हें मुरलें ॥ ५ ॥
साखरेचि चवी मुक्या न वद्वे । अनुभवेंचि हें ठरलें ॥ ६ ॥
वृत्ति न येई देहावरती । सुखरूपचि मी झालें ॥ ७ ॥
श्रीगुरु स्मरतां तत्पदिं रमतां । भवभयचि हें गेलें ॥ ८ ॥
वदत प्रभा तरि जोडुनि करद्वय । तुमच्या कृपेंचि मी तरलें ॥ ९ ॥”

## ( ६ ) बोधानंतरही श्रीजनार्दनस्वामी मूर्च्छापन्न

श्रीनाथमहाराजांच्या पुढील ओंवींवरून अतिस्पष्ट होतें कीं, श्रीदत्तप्रभूकडून अपरोक्ष साक्षात्कार झाल्यावरही श्रीजनार्दनस्वामी मूर्च्छापन्न होऊन पडले :—

“ तो बोधु आकळितां मना । मन मुकलें मनपणा ।
अवस्था नावरेचि जनार्दना । मूर्च्छापन्न पडियला ॥ ”

## ( ७ ) आत्मसाक्षात्कारीही अचेतन दंडवत पडतो

या प्रलयावस्थेंतच मुमुक्षु अचेतन टोणप्यासारखा पडतो यांत नवल नाहीं. कारण, साक्षात्कार झाल्यावरही तो पडतो. याचें स्पष्टीकरण अनेक संतवचनें देऊन आम्हीं पुढें करीत आहों. हेतु हाच कीं, वाचकांच्या मनांत या मुद्दयाबद्दल किंचितही किंतु उरूं नये. खालील लांबलचक उतारे व तेही पद्यात्मक वाचण्यास वाचकांस तसदी देत आहों त्याबद्दल दयाळु वाचकवर्ग क्षमा करतील अशी आशा आहे.

## ( ८ ) समाधिसुखाचे संतांचे अनुभव

( १ ) श्रीसोहिरोबानाथांच्या प्रबोधकाळच्या स्थितीचें अर्थात् खऱ्या समाधीचें वर्णन :—

**"एकत्र होतां उभयदृष्टी । हारपोनी गेली सहजीं त्रिपुटी । मंत्रोपदेश कर्णपुटीं । कृपादृष्टि* नाथजींची ॥ पद्मकर तो पडतां शिरीं । देहभान कैचें शरीरीं । तटस्थता वरिली बरी । नाहीं सरी दुजी तया ॥ घेरिला सोहिरा महाभूतानें । अचेतन पडला सहजीं जाणें । अलक्षमुद्रा बाणली पूर्णपणें । कोण जाणे तया सुखा ॥ जेथें**

* असे महात्मे आहेत कीं ज्यांच्या अंगीं नुसत्या स्पर्शानें, ईक्षणानें किंवा इच्छामात्रेंकरून अध्यात्मिक ज्ञानाचा प्रत्यक्ष अनुभव देण्याचें सामर्थ्य आहे. त्यांच्या मनांत आलें तर ते तुम्हांला एका क्षणांत मुक्त करूं शकतील. त्यांच्या तेजस्वी, दैदीप्यमान् व प्रबळ नेत्रांचें तुमच्याकडे एक ईक्षण झालें कीं पुरे, तुम्ही चौऱ्यांशीं लक्ष जन्म-मरणाच्या फेऱ्यांतून मुक्त झालांत म्हणून समजा. एखादा मनुष्य कितीही पापी व दुराचारी असला तरी तो अशा सत्पुरुषाच्या हाताच्या स्पर्शानें सुधारून महाभाग साधु बनतो. त्यांच्या संगतीचा योग्य उपयोग केला तर हजारों जन्म-मरणांच्या यातनांतून तुम्हीं मुक्त व्हाल. अशा महानुभाव, अवतारिक सत्पुरुषांची संगत लाभली, तर तुमच्यावर ईश्वराची अगदीं क्वचित् होणारी कृपा झाली आहे, अशी खात्री असूं द्या.

— स्वामी श्रीरामानंदतीर्थ.

**प्रत्यक्ष गोरक्षाचा । अनुग्रह झाला तयासी साचा । तो कोण वर्णी ग्रंथीं वाचा । दृष्टांताचा तर्क न चले ॥ झडपण झाली ब्रह्मग्रहाची । तेथें शुद्धि उरली कैंची । धांउनी आलीं समग्र घरिचीं । देवऋषींचीं घरें फिरती ॥ नाना प्रकारें करिती उपाय । वोवाळुनी टाकिती द्विपाद चतुष्पाय । परि तो सोहिरा कोणा न पाहे काय । जाहला अपाय असोनी ॥ विदेह स्वरूपीं जडली विवसी । तन्मय जाहला आत्मस्वरुपाशीं । रमली वृत्ति स्वानंददेशीं । जाहल्या दासी मुक्ती त्या ॥ असो कांहीं काळानंतर । सांवरुनि प्रेमा स्वरूपाकार । विचारिती महीवरी योगेश्वर । बोलती उद्गार ब्रह्मींचे ॥ भोजनाची होतां तृप्ति । ढेंकर बाहेर जेविं येती । जनां शब्द ते न कळती । धिःकारिती वेडा म्हणुनी ॥ ऐशा प्रकारें स्वगृहीं । खुळ्यासारिखे वर्तती देहीं । प्रपंचकार्य करणें नाहीं । निमग्न ठायीं चिदाकाशीं ॥ "**

— भक्तमंजरीमाला.

श्रीराजारामप्रासादी वरील उताऱ्यांत स्पष्ट म्हणतात कीं, '**घेरिला सोहिरा महाभूतानें । अचेतन पडला सहजीं जाणें ।**' अर्थात् सद्गुरूचें कृपावलोकन होतांच श्रीसोहिरोबानाथ अचेतन टोणप्यासारखे भूमीवर पडले.

ईश्वरकृपेनें ज्यांची चित्तशुद्धि चांगली झाली आहे अशा शिष्यांना सद्गुरु आत्मस्वरूपाचा साक्षात्कार दर्शनानें, स्पर्शनानें, ( वरदहस्तानें, आलिंगनानें वगैरे ), ईक्षणानें म्हणजे कृपावलोकनानें, वागमृतें ( संवादानें किंवा केवळ शब्दमात्रें ) किंवा शेषप्रसादें करून देत असतात.

( २ ) श्रीरामचंद्रप्रभूंना निर्विकल्प समाधि प्राप्त झाली त्या वेळच्या स्थितीचें वर्णन श्रीभावार्थरामायणांत आलें आहे, तें असें :—

**"होतां स्वरूपीं भेटी । चित्तचैतन्या पडली मिठी । हर्षबाष्प दाटलें कंठीं । आनंद पोटीं न समाये ॥ आनंद हृदयीं न माये । तो नेत्रीं उलथूं पाहे । पूर्ण दाटला विस्मयें । देहाची सोय स्फुरेना ॥ प्राण पांगुळला जेथींचा तेथ । कंठ जाहला सद्गदित । इंद्रियें**

**उपरमलीं समस्त । पाडिलें ताटस्थ चिद्रूपत्वें ॥ सर्वांगीं रोममूळीं । आली स्वेदकणिका निर्मळी । मुक्तमोतियांची जाळी । पांघुरविली निजसत्त्वें ॥ निःशेष नाठवे मी तूंपण । खुंटली वाचा पडिलें मौन । जिवशिवाचें पुसिलें भान । चित्त समाधान पावलें ॥ "**

याच श्रीभावार्थरामायणांत मंडोदरीस श्रीसीता माउलीनें अनुग्रह करतांना प्राप्त झालेल्या भावावस्थेचें पुढीलप्रमाणें सुंदर वर्णन आलें आहे :—

**" ऐकोनि सीतेच्या उत्तरीं । पूर्णावस्था मंदोदरी । चढला स्वेद कंप शरीरीं । आनंदलहरी दाटली ॥ इंद्रियां विकळता झाली । चित्त चैतन्या मिठी पडली । अंतरीं सुखोर्मी दाटली । तेणें पडली मूर्च्छित ॥ बाप सद्‌गुरूचें सामर्थ्य । अलौकिक अत्यद्भुत । वचनमात्रें शक्तिपात । झाली निश्चित मंदोदरी ॥ नाहीं हस्तक मस्तक । कृपें कळवळोनि देख । वचनमात्रें दिधलें सुख । झाल्या कल्पांत सरेना ॥ छळणें करोनि बोलतां । तत्काळ झाली समाधि अवस्था । सद्भावें विनटतां संतां । न कळे तत्त्वतां काय देती ॥ जाणोनियां श्रोते सकळ । ज्यांसी निजप्राप्तीचा कळवळ । तिहीं सांडोनियां छळ । सेवावे अविकळ सज्जन ॥ "**

( ३ ) श्रीदत्तांनीं श्रीजनार्दनस्वामींवर अनुग्रह केला व त्यांस स्वरूपानुभव देऊन कृतार्थ केलें, याची हकीगत समास ४ मध्यें येऊन गेलीच आहे.

( ४ ) श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं ' स्वात्मानुभवां 'त खऱ्या समाधीचा खुलासा केला आहे, तो असा :—

**" समाधि म्हणिजे मन समाधान । तयांतें राहे द्रष्टा होऊन । समाधि अथवा असमाधान । हे धर्म मनाचे ॥ तथापि सांगो उन्मनी । गुरुसंप्रदायेंकरूनी । शिष्याचिया माथां ठेवोनि पाणी । उपदेशमार्गे ॥ नांवरूपदृश्यातीत । अवघिया वृत्ती सांगे कृपावंत । न कळे तरि शक्तिपात । बळेंचि करी ॥ तेथिंचा अनुभव कैसा । तरि नोहे सुषुप्ति ऐसा । करणीवीण पावे ठसा । उन्मत्तवत ॥ जैसें**

उन्मत्त द्रव्य भक्षिलें । न झांकोनि नेत्र झांकिले । सर्वांग शोषण झालें । जडवत ॥ सर्वही शरीर विकळ । पादपाणी चळवळ । जिव्हा किंचित वेंबळ । ऐसी दशा ॥ मुहूर्त जालिया ऐसें । म्हणिजे चैतन्य ओतिलें तये मुसे । साक्षित्वें वसोनि नसे । सर्वांमाजी ॥ ऐसें करी तो कीर । निर्गुण तोचि झाला साकार । तेणें तारिलें चराचर । संशयो नाहीं ॥ "

( ५ ) श्रीतुकाराम महाराज पुढील अभंगांत निर्विकल्प-समाधिसुखाचा आपला अनुभव देतात :—

" स्थिरावली वृत्ती पांगुळला प्राण । अंतरीची खूण पावूनियां ॥ १ ॥
पुंजाळले नेत्र जाले अर्धोन्मीलित । कंठ सद्गदित रोमांच आले ॥ २ ॥
चित्त चाकाटलें स्वरूपामाझारी । न निघे बाहेरी सुखावलों ॥ ३ ॥
सुनीळ* प्रकाश उदेजला दिन । अमृताचें पान जीवनकळा ॥ ४ ॥
शशि-सूर्या जाली जीवें ओंवाळणी । आनंदा दाटणी आनंदाची ॥ ५ ॥
तुका म्हणे सुखें प्रेमेंसी डुलत । विरालों निश्चित निश्चितीनें ॥ ६ ॥ "

वरील सर्व संतवचनोक्तींचें सार श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या ' हरिपाठां '-तील पुढील एका अभंगांतच सांगतां येईल :—

" साधुबोध झाला नुरोनियां ठेला । ठायींच मुराला अनुभवें ॥ १ ॥
कापुराची वाती उजळली ज्योती । ठायींच समाप्ती झाली जैसी ॥ २ ॥
मोक्षरेखे आला भाग्यें विनटला । साधूचा अंकिला हरिभक्त ॥ ३ ॥
ज्ञानदेवा गोडी संगती सज्जनीं । हरि दिसे जनीं आत्मतत्त्वीं ॥ ४ ॥ "

* वृत्ति स्वरूपांत जातांना निरनिराळ्या युगांत निरनिराळे भास कसे होतात याचें स्पष्टीकरण श्रीवामनपंडितांनीं पुढील सवाईत फार सुंदर रीतीनें केलें आहे, तें असें :—

" वर्णित वर्ण अनेक विध श्रुति तप्त सुवर्ण सुगौर तसा ।
सत्ययुगीं स्फुरतो स्फटिकोपम कर्मयुगीं उदयार्क जसा ॥
द्वापरीं नीळ सुनीळ सुनीरद माधव याहि युगांत असा ।
श्यामल कोमल वामन मानसिं सुंदर या कलिमाजि ठसा ॥ "

'सद्भक्ति-प्रकाश', वर्ष ७, अंक २ मध्यें 'उत्तम भागवतावस्था' या मथळ्याखालीं (१) श्रीब्रह्मदेव, (२) श्रीनारदमहामुनी, (३) श्रीदत्तात्रेय, (४) श्रीअर्जुन व (५) श्रीउद्धव यांच्यांत अष्ट सात्त्विकभाव प्रगट झाल्यावेळच्या स्थितीचें उत्तम वर्णन आलें असून, शेवटीं वारकरीपंथाचे प्रवर्तक व श्रीविठोबाच्या गळ्यांतील प्रत्यक्ष ताईत जे श्रीनामदेवराय त्यांना समकालीन संतविभूतींनीं 'कच्चे मडकें' ठरविल्यावर ते विठोबाला अनन्य शरण जाऊन चरणीं लीन झाले. त्या वेळीं त्यांची स्थिति काय झाली ती स्वत: श्रीनामदेवरायांनींच आपल्या गोड व प्रेमळ शब्दांत कथन केली आहे, ती येणेंप्रमाणें :—

**"म्हणूनि नाम्या तुवां गुरुसी शरण जावें। तेणें भवबंधनें मुक्त होती ॥१॥**
**ऐसें ऐकूनियां नामा थरारिला। मूर्च्छागत झाला भूमीवरी ॥ २ ॥**
**भूमी लोळे नामा कंठ सद्गदीत। डोळियां स्त्रवत अश्रुजळ ॥ ३ ॥**
**इतुकें देखोनियां द्रवला पुरुषोत्तम। नाम्यासि सप्रेमें उचलिलें ॥ ४ ॥"**

## (९) समाधीसंबंधीं आधुनिक विद्वज्जनांचीं गैरमतें

श्रीनामदेवांच्या वरील निवेदनावरून अतिस्पष्ट होतें कीं, श्रीनामदेव हे वारकरी पंथाचे अध्वर्यु* असून त्यांनाही इतर थोर संतविभूतींप्रमाणें वर वर्णिलेल्या भावावस्थांतून जावें लागलें. अर्थात् ते स्फुंदस्फुंदून रडले,

---

* प्रा. शंकर वामन दांडेकर यांनीं लिहिलेल्या 'वारकरीपंथाचा इतिहास' या पुस्तकांत श्रीनामदेवाच्या पारमार्थिक कामगिरीबद्दल पुढील गौरवपर उद्गार काढले आहेत:—

" श्रीज्ञानदेवांनीं ज्ञानेश्वरीरूपी प्रतिसृष्टीच निर्माण करून वारकरी संप्रदायाच्या तत्त्वज्ञानास मूर्त स्वरूप दिलें, असें म्हणावयास हरकत नाहीं.

हा पाया भरभक्कम करण्याची कामगिरी जरी श्रीज्ञानदेव यांनीं केली तरी वारकरी भजनीकीर्तनाचा हा मार्ग रूढ करून श्रीपंढरीनाथाची कीर्ति पंजाबांतील घुमान गांवापर्यंत पोंचविण्याची कामगिरी श्रीपंढरीनाथाचे कंठमणी, श्रीज्ञानदेवांचे समकालीन एवढेंच नव्हे तर, सोपानशिष्य विसोबाखेचरद्वारा नाथपरंपरेंत

भूमीवर पडले, निचेष्टित झाले, वगैरे, वगैरे. असें असून एक आधुनिक विद्वान् वारकरी म्हणतात :—

**"शरीर ताठ होऊन मूर्च्छा आल्यासारखें पडणें ही समाधि वारकरी संतांना मौल्यवान् वाटत नाहीं. त्यांची समाधीची कल्पना वेगळी आहे."**

जी समाधि वारकरीपंथाचे पुरस्कर्ते श्रीनामदेवराय यांना व इतर समकालीन सर्व थोर संतविभूतींना मान्य झाली, इतकेंच नव्हे तर जी समाधि त्यांनीं प्रत्यक्ष अनुभविली ती समाधि आधुनिक वारकरी संतांना '**मौल्यवान्**' कां वाटूं नये याचें राहून राहून मोठेंच आश्चर्य वाटतें !!

---

समाविष्ट झालेले बालभक्त श्रीनामदेव यांनीं केली. श्रीज्ञानेशांनीं मराठींत ओंवी विशेषत्वानें जशी रूढ केली, असेंच केवळ नव्हे तर 'अभंग' हें वृत्तच ओंवीच्या थोड्याफार फरकानें नामदेवराय यांनीं सुरू केलें व शतकोटी अभंग रचण्याची भीष्मप्रतिज्ञा करून आपल्या आयुष्याखेर ती बहुतेक तडीस नेली. श्रीनामदेव यांचा जन्म व पूर्ववय पंढरपुरांतच गेलेलें असल्यामुळें, त्यांस श्रीपंढरीशाची उपासना बालपणांतच लाभली व त्यांनींही त्या अपूर्व संधीचा फायदा घेऊन कौमारवयांतच भक्तवत्सल श्रीपंढरीनाथास स्ववश केलें. महाराष्ट्रां-तील कीर्तनभक्तीरूप सरस्वतीस, गुप्त रूपांतून काढून भरतखंडास पावन करण्याइतका तिचा ओघ उघड विस्तृत करण्याचें मुख्य श्रेय शिंपीभक्त नामदेवराय यांसच दिलें पाहिजे.

**तें या नामयाचें होतें हृदयकमळीं । कथा भूमंडळीं प्रगट केली ॥**
**उघडली मांदुस भक्तिनाम तारू । विठ्ठल उद्धारु कलियुगीं ॥**

—( श्रीनामदेव तीर्थावळी )

आळंदी येथें जिवंत समाधि घेतलेले श्रीनिवृत्तिनाथसुत हे खरोखरच ज्ञान-देव ( ज्ञानाचे उपास्य-देव ) होते. तर श्रीपांडुरंगाच्या तळीच्या पायरीखालीं बसणारे बालभक्त, महाराष्ट्रीय कीर्तनपरंपरेचे नारद हे खरोखरच नाम-देव ( नामाचें उपास्य-देव ) होते."

कांहीं विद्वद्वर्य तर या समाधिस्थितीस हिप्नॉटिझम्, मेस्मेरिझम, हिस्टेरिया, वगैरे, वगैरे नांवें ठेवून तिच्या वैभवशाली परमपावनस्थितीचा ऱ्हास करतात व तिला एखाद्या भावकादेवीचें स्वरूप देतात! खरोखरच हें किती लांच्छनास्पद आहे याचा मागील पृष्ठांत समाधीसंबंधीं जें विस्तृत विवेचन केलें गेलें आहे त्यावरून वाचकांनीं आपल्या मनाशींच विचार करावा.

## (१०) परमहंसांबद्दल प्रथम मुलाखतींत झालेला स्वामी विवेकानंदांचा गैरसमज

फार कशाला, श्रीरामकृष्ण परमहंसांचे पट्टशिष्य श्रीनरेंद्र अर्थात् स्वामी विवेकानंद व लाटू यांचा श्रीरामकृष्णांच्या बाबतींत जो पुढील गमतीचा संवाद झाला, त्यांत स्वामींचें परमहंसाबद्दल आरंभीं काय मत होतें, तें अगदीं स्पष्ट दिसून येत आहे:—

"अरे, त्यांच्या कमरेस धोतर सरळ नसतें, हातपाय वांकडेतिकडे होतात, ईश्वराचें नांव ऐकलें कीं थयथय नाचत सुटतात, मान नाहीं, इज्जत नाहीं, उघडे-बोडके हवे तेथें जातात. शिवाय कोणावर जादू कर, कोणावर हिप्नॉटिझम् कर, कोणावर मेस्मेरिझम् कर, असें त्यांचें चालतें. पण काय रे, तूं चोवीस तास तेथें असतोस. ते सबंध दिवसभर असेंच करतात कां? रात्रीं देखील निजत नाहींत कां?"

श्रीरामकृष्ण परमहंसांच्या समागमांत कांहीं काळ गेल्यावर '**संतसंगें माझा पालट पैं झाला**' या श्रीनामदेव महाराजांच्या सदुक्त्यनुरूप स्वामी विवेकानंदांचे सर्व तर्ककुतर्क साफ नाहींसे होऊन, परमहंस ही एक असामान्य संतविभूति आहे असा त्यांच्या बुद्धीचा परमहंसकृपेनें पालट झाल्याचें कै. श्री. न. र. परांजपे यांनीं परमहंसांच्या चरित्रांत पुढीलप्रमाणें स्पष्ट निवेदिलें आहे:—

"श्रीरामकृष्णांच्या अलौकिक शक्तिप्रभावानें नरेंद्राचें अशा रीतीनें पुन्हा एकवार भावांतर झाल्यामुळें तो अत्यंत चकित होऊन गेला. त्यांच्या

प्रचंड दैवी शक्तीपुढें आपली बुद्धि व शक्ति किती अल्प आहे, याचा त्याला प्रत्यक्ष अनुभव आला. ते अर्धोन्माद आहेत अशी जी त्याची कल्पना होती, ती पार कोठच्या कोठें नाहींशी झाली व इच्छामात्रेंकरून वाटेल त्याचें मन फिरवून तें उच्च मार्गाकडे सहज लीलेनें वळविणारा हा मनुष्य सामान्य नसून, कोणी तरी दैवीशक्तिसंपन्न असामान्य योग्यतेचा महापुरुष असला पाहिजे, अशी त्याची बालंबाल खात्री होऊन गेली ! आणि आपल्यावर या महापुरुषाचें केवढें प्रेम आहे हें आठवून, त्याला स्वतःची धन्यता वाटूं लागली !"

खऱ्या समाधिसुखाचा अनुभव श्रीगुरुमुखानें प्राप्त होऊन तो अभ्यासानें बाणल्यावर अशा स्थितप्रज्ञांमध्यें जे कोणी सदोदित जडमूढ स्थितींत राहातात किंवा दुसऱ्यांस तें ज्ञान देण्यासंबंधीं कृपण असतात ते ईश्वरास मान्य नसून, जे कोणी आपल्या उपमेनें जीवांस ज्ञान देऊन व त्यांना भक्तिमार्गास लावून त्यांचा उद्धार करतात, तेच ईश्वरास अतिप्रिय असून, त्यांना तो देह पडल्यावर आपल्या श्रीवैकुंठास नेतो, असें श्रीकृष्ण अर्जुनास श्रीभगवद्गीतेच्या पुढील दोन श्लोकांत सांगतात :—

(१) **आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन ।**
**सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः ॥**

(२) **य इदं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति ।**
**भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयः ॥**

## (११) शांतावस्था अगर तटस्थता

जडमूढ अशा स्थितींत राहाणाऱ्या स्थितप्रज्ञांसंबंधीं येथें दोन शब्द लिहिणें अत्यावश्यक आहे. या स्थितीचा बहुतेक सर्व संतांनीं कसा निषेध केला आहे, हें त्यांच्याच वचनद्वारा आम्हीं पुढें योग्य स्थळीं दाखविणार आहोंत.

शांतावस्था अगर तटस्थता हिचें वर्णन करण्यापूर्वी प्रथम सुषुप्ति व समाधि यांतील भेदासंबंधीं थोडा खुलासा करावासा वाटतो.

## सुषुप्ति व समाधि यांतील महदंतर

' उपनिषद्रत्नाकर – १ ' यांतील प्रश्नोपनिषदांत श्री. मोहोळकर यासंबंधीं म्हणतात :—

" केवळ इंद्रियें व विषयसहचारी मन यांचे जाणिवेचे व्यापार बंद झाले तर त्या अवस्थेला सुषुप्ति किंवा झोंप म्हणतात. सुषुप्ति व समाधि यांत अंतर म्हणजे सुषुप्तींत श्वासोच्छ्वास चालू असतो, तसा तो समाधींत नसतो. समाधींत श्वासोच्छ्वासही बंद पडतो; तसेंच सुषुप्तींत बाह्य विस्मृतीबरोबर आंतर व उच्चतर शक्तींची जागृति नसते. तसें समाधींत नसतें. तेथें बाह्य पूर्ण विस्मृतीबरोबर आंतर उच्चतम जागृति असते."

श्रीनारायण महाराज जालवणकर यांनीं ' समाधितत्त्वोपदेश '§ या गद्यात्मक ग्रंथांत सुषुप्तीची व्याख्या दिली आहे, ती अशी :—

" **बुद्धीचे केवळ तमःप्लुत क्रियाविहीन निगूढ अवस्था मात्र सुषुप्ति म्हणतात.** "

---

§ यांत आद्यसद्गुरु श्रीनारायण महाराज जालवणकर यांनीं श्रीदत्तमुखें लाभलेला स्वानुभव दिला आहे. तोच गर्भ वा हंस या उपनिषदांत उपदेशिलेला असून ब्रह्मोपनिषदाचें सारही तोच आहे. या तत्त्वोपदेशाचीं एकंदर तीन प्रकरणें असून प्रथम प्रकरणाचें सार साधकाचा सद्गुरूपासून प्राप्त झालेल्या बोधावर पूर्ण विश्वास असावा हेंच आहे. द्वितीय प्रकरणांत असें प्रतिपादिलें आहे कीं, साधकास सद्गुरूपासून प्राप्त झालेल्या बोधांत पूर्वसंस्कारामुळें राहातां येत नसल्यास त्यानें मन साकारीं ठेवून बुद्धीचा प्रवेश निराकारीं करावा. येणेंकरून तो भगवद्रूप होऊन देहपातानंतर सगुणमुक्ति पावेल. तृतीय प्रकरणांत महाराजांचें म्हणणें असें आहे कीं, साधक द्वितीय प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें करूं शकत नसल्यास त्यानें श्रवणकीर्तनादि भक्ति–वैराग्याचें बळ कायम ठेवून–केली असत तो सहज पूर्ण होतो.

म्हणजे तमोगुणानें भरलेली अर्थात् जिच्यांत तमोगुण प्रधान आहे अशी ही अवस्था होय. बुद्धींत तमाचें पूर्ण भरतें आल्यामुळें जी गाढ निद्रितावस्था प्राप्त होते तींत जाणीव असतांही बुद्धीस ही जाणीव व्यक्त करतां येत नाहीं व क्रियाही करितां येत नाहीं. या निद्रावस्थेचाही चिदात्मा साक्षी असतो आणि त्या स्थितीचेंही त्याला ज्ञान असतें; याचें कारण तो जागा होतांच आपणास गाढ झोंप लागली असें स्वतःच सांगतो ( **जागृत स्वप्न सुषुप्तित साक्षी हें कोणी आणुनि ध्याना । कमलदलीं जसें अलिवत मन हें आत्मस्वरूप कां ध्या ना? ॥ तुम्हीं अचलपदीं राहोन, सदोदित अद्वयसुख कां घ्या ना? ॥**–सोहिरोबा ). येथें कोणी असें म्हणतील कीं निद्रावस्थेंतील अचंचल स्थितीची त्या वेळीं त्यास जाणीव नसते. तर त्याचें उत्तर असें कीं, सर्व चलनवलन क्रिया बंद असतात त्याच वेळेस चिदात्म्याला त्या अचंचल स्थितीचेंही पूर्ण ज्ञान असतें ( **सुषुप्तींत नाठवे कांहीं । जरी म्हणसील आत्मा नाहीं । तरी जागा होऊनि तूंचि तेंहि । सुख तेथील आठविसी ॥ सुखें निजलों अत्यंत । कांहींच न कळे निद्रेंत । अवलंबूनि मग बुद्धि चित्त । तूंचि ऐसें आठविसी ॥ लावितां कांचेचे उपनेत्र । हिरवें दिसे आपुलें गात्र । उपनेत्र काढितां तेचि नेत्र । हिरवें कांहीं न देखती ॥**–निगमसार; **भावातीत आनंद नाहीं । ऐसी शंका न धरीं पाहीं । बारे सुषुप्तीमाजीं कांहीं । संकल्प असे ॥ सुषुप्तींत संकल्प नसता । तेथूनि जेव्हां जागा होतां । गोड निद्रा लागली म्हणता । कासयानें ॥ तेथें कांहीं संकल्प नव्हता । ना भोग्य विषयाचा भोक्ता । भावाभावातीत असतां । सुखीया कैसा झाला तो ॥ तो आनंदसिंधु नसता । तरी सुखी होतों कैसा म्हणता । निर्विकल्प तो आनंद होता । तेणें झाला सुखीया तो ॥** — आनंदसागर ).

आतां ‘ निद्रावस्थेंतील अनुभव जागृतावस्थेंत कसा सांगतां ?’ या शंकेचा परिहार स्पष्टपणें असा आहे. सुषुप्त्यवस्थेंत जेव्हां वृत्ति नव्हती त्या वेळीं तिची ‘ क्रिया उपाधिरहित ’ अथवा अचंचल स्थितीची आम्हांस पूर्ण

जाणीव होती म्हणून वृत्ति येतांच ती सांगतां आली. ती जागृतावस्थेंत जाणली असें म्हणतां येत नाहीं. हा मुद्दा श्रीवामनपंडितांनीं यथार्थदीपिकेंत जिभेचा दृष्टांत देऊन स्पष्ट केला आहे, तो असा :—

**"जैसी घडी एक मौन धरुनी। जिभेस घडी एक आवरूनी। मागुति बोलतां त्याच जिभेकरूनी। रूपें होती दों हींची॥ जीभचि म्हणे राहिला होता शब्द। जिभेवीण आत्मा तो निःशब्द। परी जीभ नाहींशीच जाली स्तब्ध। आत्मा होतां स्वप्रकाश॥ मौनीं नव्हतें बोलणें। तें जिभेनेंचि वर्णिलें अबोलणें। तैसें सुषुप्तींत बुद्धीचें न जाणणें। बुद्धीच बोले॥"**

वरील श्रीवामनपंडितांच्या विचारांना पोषक असेंच निरूपण श्रीबलभीमबोवा साडेकर* यांनीं आपल्या एका पत्रांत पुढीलप्रमाणें केलें आहे. त्यावरून सदर्हू मुद्द्यावर विशेष प्रकाश पडतो :—

"समाधि आणि सुषुप्ति यांत बाह्यत: ऐक्यत्व दिसतें पण वास्तविक पाहातां त्यांत फार भेद आहे. समाधि व सुषुप्ति या दोन्ही अवस्था एकच असल्या तर खुशाल झोंपच घेत बसावें; मग समाधीची आवश्यकता काय? झोंपेंत मन बुद्धि मूर्च्छित करण्यांत राहातें आणि समाधींत '**मन रामीं रंगलें। अवघें मनचि राम झालें।**'. समाधि-सुखांत मन एकदा लीन झालें कीं, मग '**सबाह्याभ्यंतरीं अवघें रामरूप कोंदलें**' असें होईल. असें झाल्यावर मग व्यवहारांत असतांही समाधीच आहे. समाधि आणि व्युत्थान दोन्हीही नाहीं. मग कशाची समाधि व कशाचें व्युत्थान? जो आहे तो मीच मी अवघा. आतां ध्यान धारणा कशाकरितां?

*श्रीबलभीमबोवा साडेकर (इ० स० १८५३–१९०९) हे दत्तसाक्षात्कारी श्रीनारायण महाराज जालवणकर यांचे प्रशिष्य अर्थात् इंदूर येथील श्रीलक्ष्मणबावा वेलणकर यांचे शिष्य होत. यांची समाधि नरसिंगड येथें आहे. यांचें चरित्र व पत्रें नाशीक येथील श्री. रामचंद्र बळवंत खाडिलकर, बी. ए., एल्.एल्.बी., यांनीं प्रसिद्ध केलीं आहेत.

सहजावस्था बाणेपर्यंत ध्यान, धारणा वगैरे अभ्यास पाहिजे. पण ती बाणल्यावर मग ध्यान नाहीं व धारणा नाहीं. द्वैत नसून " **भक्तिसुखालागीं। आपणचि झाला उभय भागीं। वाटोनिया अंगीं। सेवकें बाणे ॥** " –ज्ञानेश्वर. मग 'सततं कीर्तयंतो माम्'– (गीता) किंवा 'कृष्णाय वासुदेवाय हरये परमात्मने' याप्रमाणें देह असतांही विदेहस्थिति आणि जीव असतांही मुक्तस्थिति, जीवन्मुक्तदशा भोगावी."

आतां आपण '**शांता** अगर **तटस्थावस्थे**'कडे वळूं :—

" बुद्धि आत्मानंद भोग अवस्था सांडून तटस्थ होते. ती स्वानुभूति-प्रतीति मात्र राहते, ती शांतावस्था बोलिजे. कोणी तटस्थावस्था यासच म्हणतात." अशी शांतावस्थेची व्याख्या श्रीनारायण महाराज जालवणकर यांनीं वर उल्लेखिलेल्या 'समाधितत्त्वोपदेशां'त दिली आहे. श्रीएकनाथी भागवतांत, श्रीरंगनाथी योगवासिष्ठांत व श्रीविवेकसिंधूंत या अवस्थेचें विस्तृत वर्णन आलें असल्यामुळें तेथील उतारे अनुक्रमें खालीं देत आहों :—

**" सर्व कर्मीं वर्ततां जाण। देहाचें स्फुरेना देहपण। तें मुख्य समाधि लक्षण। स्वयें श्रीकृष्ण सांगत ॥ सर्व संकल्पांची अवधी। त्या नांव निर्विकल्प समाधी। सकळ शास्त्र हेंचि प्रतिपादी। समाधि त्रिशुद्धी या नांव ॥ साधु आल्या शेळीप्रती। तटस्थ होय सकळ वृत्ती। तैशी झालिया ताटस्थ स्थिती। नव्हे निश्चितीं ते समाधि ॥ अकस्मात अवचितां। दिव्य स्वरूप देखतां। आश्चर्यें झाली तटस्थता। तेथ जाणावी तत्त्वतां वृत्ती आहे ॥ स्वरूप देखतां प्रथमदृष्टी। न संवरतु विस्मयो उठी। तोही जिरवूनियां पोटीं। दशा जे उठी ते समाधि ॥ निःशेष कल्पना जेथ विरे। तेथ विस्मयो कोठें स्फुरे। सूक्ष्म कल्पना थावरे। तेणें वोसरे विस्मयो ॥ जेथ साचार ब्रह्मप्राप्ती होये। तेथें देहहि स्फुरों न लाहे। तेव्हां तटस्थ कीं चालताहे। हें देखणें होये पुढिलांचें ॥ तेवीं पावोनि स्वरूपप्राप्ती। योगी प्रारब्धाच्या स्थितीं। नाना कर्मे करितां दिसती। परी निजात्मस्थिती भंगेना ॥ यालागीं समाधि आणि व्युत्थान। या दोहीं अवस्थांचें लक्षण।**

अपक्कासीची घडे जाण । परिपूर्णासी लक्षण तें कैचें ॥ स्वरूपावेगळें कांहीं एक । पूर्णासी उरलें नाहीं देख । समाधि व्युत्थानाचें मुख । त्यांसन्मुख येवो लाजे ॥ अर्जुना देवोनि समाधि । सवेंचि घातला महायुद्धीं । परी कृष्ण कृपानिधी । तटस्थ त्रिशुद्धी न करीच ॥ यालागीं समाधि व्युत्थान विधी । ताटस्थेसहित निरवधी । गिळूनि झाली सैर समाधी । पूर्ण निजपदीं विलसतां ॥ ओंवाळणीचिया आस्था । बहुरूपी सोंग संपादितां । वायू स्तंभविला अवचितां । तेणें तटस्थता बहुकाळ ॥ परी वासना जंव उरली आहे । तंव समाधि कैसेनि हो लाहे । सावध होतांचि म्हणे काये । ये दात्याचे रायें उचित द्यावें ॥ " —एकनाथी भागवत.

" ज्ञानिनामपि चित्तं चेत्केवलात्मसुखोदितम् ।
सत्त्वाः संसारदुःखार्ताः कं यान्ति शरणं तदा ॥

ज्ञानियाचें जरी चित्त । सर्वदा होतें वस्तुगत । बाह्य पदार्थ नेणत । सुखसंवलित आत्मत्वें ॥ तो निर्विकल्पसमाधि । साधूंसि असतां निरवधि । केवल आत्मसुखैकाब्धीं । मनःशुद्धि विसरोनि जाये ॥ तेथें चालणें ना बोलणें । नाहीं उत्थान पाहणें । नाहीं कर्माचें करणें । आपणेविण न देखे ॥ ऐसे सर्वदा समाधिस्थ । निरंतर राहते जरी संत । तरी लोक जे अज्ञानवृत्त । शरणागत कोणासी जाते ॥ सर्वदा ताटस्थेंचि पाहिजे बैसलें । तऱ्ही जनक राज्य कां पां केलें । व्यासादिक काय ताटस्थें राहिले । गार्हस्थ केलें वसिष्ठादिकीं ॥ वाणिज्य करी तुळाधारू । कर्कटी करी मनुष्याहारू । भागवत सांगे श्रीशुकेंद्रु । कर्मांतरु श्रीदत्त सांगे ॥ ऐसे ज्ञानिये सांगों किती । नारदासि कळीवरी अतिप्रीति । सनकादिक ते सर्वत्र हिंडती । तैसीचि गति जायंताची ॥ ऐसें सहज स्थितीनें योगेश्वर । येक चालविती सर्वही व्यवहार । परी ते अकर्ते निर्विकार । परावर स्वयें जाले ॥ "

—रंगनाथी योगवासिष्ठ.

" निर्विकल्प दशेविण । जीवन्मुक्तांचें कांहींच नव्हे न्यून । ते ब्रह्मचि होती आपण । तेथें न्यून तें काय ॥ ' ब्रह्मैव सद्ब्रह्माप्येति ' । विमुक्तश्च विमुच्यत इति ' । हें श्रुतिद्वय जीवन्मुक्ती । बोलिजे पूर्ण

बोधासी ॥ निर्विकल्पदशेविण सुटिका । जरी न होती पैं ऐका । तरी कां न राहती शुकादिक देखा । तेथ विषयीं ॥ न सुटति जे चरम दशेविण । ऐसें बोलती विवेकहीन । तयां धीटवादियातें कवण । दंडीतसे ॥ 'शुको मुक्तो वामदेवो मुक्तो' । हें श्रुतिवाक्य असे बोलत । शुक नेणे तरी भागवत । कवणें निरूपिलें ॥ 'ऋषभदेव प्रतिपाद्य' । हें श्रुतीचेनी संवादें । वामदेवादिक ब्रह्मानंदें । निवाले पैं ॥ वामदेवादि योगीश्वर । नव्हती अंध मुके बधिर । निर्विकल्पदशा निरंतर । हे तंव तयांसी नाहीं ॥ तरी वेदीं जीवन्मुक्त बोलती । तेथ विषयीं नाहीं उपपत्ती । म्हणूनि सांडीजे हे भ्रांती । संशयरूप ॥ प्रत्यक्षादिक प्रमाणें । तयांसी संभवती दूषणें । तरी श्रुतिवाक्यासि कवणें । आरोपिजेल ॥" — विवेकसिंधु.

## ( १२ ) सहजसमाधीचें स्वरूप

श्रीएकनाथ महाराज — '**नवविधा भक्ति नवरात्रि व्यक्ति । अवघिया एकचि प्राप्ति ॥**' या सुप्रसिद्ध पदाच्या ८ व्या कडव्यांत म्हणतात :—

"**सख्यत्वें परपार, पावला अर्जुन । न पुसतां दे ब्रह्मज्ञान ॥ खड्गाची खणखण, बाणांची सणसण । उपदेशाचें तेंचि स्थान ॥ युद्धाचिये संधीं, लाविली समाधी । कल्पांतीं न मोडे जाण ॥ निजसख्यें दोघां, पडलें आलिंगन । नाहीं भिन्नाभिन्नपण त्या ॥**"

नाथांच्या वरील उद्गारांवरून स्पष्ट होतें कीं, श्रीकृष्णांनीं पार्थाला समाधि लावून लगेच युद्धाला योजिलें. पार्थानें सर्वंच भारतीय युद्ध या समाधि-स्थितींत केलें. "**चालतां बोलतां अखंड समाधी । कल्पना निमाली ब्रह्मभावें ॥**" म्हणून वर्णिलेली ती हीच समाधि होय. हिलाच 'सहज-समाधि' असें म्हणतात. श्रीशिवरामस्वामींनीं एका भूपाळींत '**सहज-समाधि सहजचि भोगी पूर्णानंद उरे, शिवराम निरावरण होऊनि आनंदें वावरे ॥**' हे जे उद्गार काढले आहेत ते या सहजसमाधीलाच अनुलक्षून होत.

'योगवासिष्ठांतील तत्त्वज्ञान' या ग्रंथांत वे. शा. सं. पावगीशास्त्री यांनीं 'समाधि' या शीर्षकाखालीं 'सहजसमाधी'संबंधीं काढलेले पुढील उद्गार अत्यंत मननीय आहेत :—

" वसिष्ठांच्या मतें एखादा मनुष्य पद्मासन घालून बसलेला असला व त्यानें ब्रह्मांजलि केलेली असून बाह्यात्कारीं समाधि लावून बसल्यासारखा दिसत असला ; पण त्याचें चित्त शांत व स्थिर झालेलें नसेल, तर त्याची ती समाधि आहे, असें म्हणतां येणार नाहीं......... समाधि हा स्वभावच बनला पाहिजे. अशी ही समाधि तत्त्ववेत्त्याच्या ठिकाणीं सहज असते ; म्हणून तो व्यवहार करीत असला, तरी तो समाधिस्थितीमध्येंच असतो. अशा पुरुषाला समाधीचें निराळें अनुष्ठान तें काय करावयाचें आहे ? योगवासिष्ठामध्यें समाधीची व्याख्या अशी केली आहे :—

**'तत्त्वावबोधो भगवन्सर्वाशातृणपावकः ॥**
**प्रोक्तः समाधिशब्देन न तु तूष्णीमवस्थितिः ॥ ५-६२-८**
**समाहिता नित्यतृप्ता यथाभूतार्थदर्शिनी ॥**
**साधो समाधिशब्देन परा प्रज्ञोच्यते बुधैः ॥ ५-६२-९**
**अक्षुब्धा निरहंकारा द्वंद्वेष्वननुपातिनी ॥**
**प्रोक्ता समाधिशब्देन मेरोः स्थिरतराकृतिः ॥ ५-६२-१०**
**निश्चिन्ताऽधिगताभीष्टा हेयोपादेयवर्जिता ॥**
**प्रोक्ता समाधिशब्देन परिपूर्णा मनोगतिः ॥ ' ५-६२-११**

या श्लोकांचा भावार्थ :—आत्मतत्त्वाचा बोध हा सर्व आशारूपी तृणाला दग्ध करून टाकणारा अग्नि असून, समाधि शब्दाचा अर्थहि असाच आहे. नुसतें स्वस्थ बसणें म्हणजे समाधि असा अर्थ तत्त्ववेत्ते करीत नाहींत.

समाधि ( सम + आ + धा ) म्हणजे परमात्मस्वरूपीं स्थिर असणें, असाच अर्थ ज्ञाते पुरुष करीत असतात. जी बुद्धि नित्यतृप्त असून जी

आत्मस्वरूपाचें अखंड अनुसंधान करीत असते, तिला म्हणजेच त्या पराप्रज्ञेलाच समाधि असें विद्वान् लोक म्हणतात. जिच्या ठिकाणीं अहंकार नसतो, जी केव्हांही क्षुब्ध होत नाहीं, तसेंच जी जगांतील सुखदु:खादि द्वंद्वापासून अलिप्त असते अशा मेरुपेक्षांही स्थिर स्थितीला समाधि ही संज्ञा दिली जाते. जिच्या सकल कामना परिपूर्ण झालेल्या असतात व जिच्या ठिकाणीं हें ग्राह्य व हें त्याज्य ही भावना मुळींच शिल्लक राहिलेली नसते, अशा पूर्ण स्थितीलाच समाधि हें नांव देण्यांत येतें.

.......जीवन्मुक्तांच्या सहजसमाधीचा भंग केव्हांच होत नाहीं व तो कोणालाही करितां येत नाहीं. अशा या ज्ञानी पुरुषाची ब्रह्मरूप झालेली प्रज्ञा देह पडल्यानंतर विदेह कैवल्याची प्राप्ति होईपर्यंत आत्मतत्त्वाच्या अनुसंधानापासून केव्हांहि विराम पावत नाहीं. अशा तऱ्हेची ही जीवन्मुक्ताची सहजसमाधि म्हणजेच चालती बोलती समाधि असें म्हणण्यास हरकत नाहीं. सतत आत्मरूप असणें हा ज्ञानी पुरुषाचा स्वभावच बनून गेलेला असतो. म्हणून त्याच्या या अखंड सहजसमाधीचा विच्छेद कोण आणि कसा करणार? कारण 'आत्मस्वरूपाव्यतिरिक्त या जगांत दुसरी कोणतीच वस्तु नाहीं' असा ज्ञानी पुरुषाचा निश्चय असल्यामुळें, त्याच्या या सहजसमाधीचें व्युत्थान केव्हांही होऊं शकत नाहीं व व्यवहारांतील सर्व तऱ्हेच्या आचरणाला या समाधीचा व्यत्ययहि येत नाहीं. म्हणूनच ही चालती बोलती समाधि आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. श्रीएकनाथ महाराजांनींही या समाधीला चालती बोलती समाधि असेंच नांव दिलें आहे.

आतां यासंबंधीं थोडा तात्त्विक दृष्टीनें विचार करूं. तत्त्वत: एकटा आत्माच काय तो आहे व तो सर्वव्यापी आत्माच सर्वथा सर्व कांहीं आहे. अशी वस्तुस्थिति असल्यामुळें समाधि कशाला म्हणावयाचें व असमाधि तरी काय? ज्ञानी पुरुषाच्या दृष्टीनें विचार केल्यास समाधि आणि

असमाधि या कल्पनांना कांहींच आधार नाहीं. ज्ञानी पुरुषाची नित्य समाधीच असते. म्हणून त्याच्या ठिकाणीं समाधि लावण्याचा प्रश्नच निर्माण होत नाहीं. सारांश, समाधि व असमाधि हा अज्ञानी पुरुषाचा विषय आहे, ज्ञानी पुरुषाचा नाहीं, असेंच तत्त्वत: म्हणावें लागतें. ”

वर आलेल्या ‘ समाधि ’ शब्दाचा खरा अर्थ बुद्धीची समता ( **समसाम्यें समान बुद्धी । जे बोलिजे निजसमाधि ॥** ए. भा. ) इतकाच असल्यामुळें, जडमूढ होऊन राहण्याच्या स्थितीची योग्यास आवश्यकता नाहीं, असें पुढील संतवचनांवरून स्पष्ट होतें : —

( १ ) **कर्माचरणीं समाधी । एक म्हणती न घडे कधीं । ते पावले नाहीं निजात्मबोधीं । जाण त्रिशुद्धी विदेहा ॥ ताटस्थ्या नांव समाधी । म्हणे त्याची ठकली बुद्धी । ते समाधी नव्हे त्रिशुद्धी । जाणावी नुसधी मूर्च्छा आली ॥ ताटस्थ्यापासूनि उठिला । तैं तो समाधीस मुकला । तेव्हां एकदेशी भावो आला । मंद या बोला न मानिती सत्य ॥ समाधी आणि एकदेशी । बोलतां बोलणें ये लाजेसी । सत्य मानी ते शब्दपिशी । शुद्ध स्वरूपासी अनोळख ॥ येथें प्राचीन अतिसमर्थ । ते मूर्च्छा आणोनि करी तटस्थ । वांचूनि चालते समाधिस्थ । जाण पां निश्चित वसिष्ठादिक ॥ पाहें पां देवर्षि नारदु । विनोदें न मोडे समाधिबोधु । याज्ञवल्क्याचा समाधिसंबंधु । ऋषि प्रसिद्ध परीक्षा केली ॥ स्वरूप देखोनि मूर्च्छित जाहला । तो आपणिया आपण तरला । स्वयें तरूनि जन उद्धरिला । तो बोधु प्रकाशिला शुकवामदेवीं ॥ यालागीं समाधि आणि व्युत्थान । या दोनी अवस्थांसहित जाण । बुद्धी होये ब्रह्मार्पण । अखंडत्वें पूर्ण समाधी ॥ अर्जुना देऊनि निजसमाधी । सवेंचि घातला महायुद्धीं । परी तो कृष्ण कृपानिधी । तटस्थ तें त्रिशुद्धी नेदीच स्पर्शों ॥ सकळ कर्मीं समाधी । हे सद्गुरूचि बोधी बुद्धी । तरी युद्धींही त्रिशुद्धी । निजसमाधी न मोडे ॥ बुद्धीं आकळलें परब्रह्म । तैं अहेतुक चाले कर्म । हेंचि बुद्धीचें अर्पण परम । इतर तो भ्रम अनुमानज्ञान ॥ स्वरूपीं दृष्टीं निरवधी । अनवच्छिन्न समानबुद्धी । कर्माकर्मीं अज्ञान न बाधी । परमसमाधी**

तिये नांव ॥ निःशेष गेलिया देहबुद्धी । स्वरूपपणें फुंज न बाधी । कर्माकर्मीं अज्ञान न बाधी । ते परमसमाधी निर्दुष्ट ॥ ते स्वरूपीं निरवधी । भजनशीळ जाली बुद्धी । ते सकळ कर्मीं समाधी । निजार्पणाविधी स्वयें जाहली ॥ जेथें शमली मनाची आधी । ते जाणावी परमसमाधी । समाधी घेणें ते देहबुद्धी । काष्ठ तें त्रिशुद्धी मूर्च्छितप्राय ॥ " — ( ए. भा. अ. २. ४२३–३७ ).

( २ ) " एवं चाले बोले उठे बसे । तरी अन्वयसमाधि लागला असे । कीं जडचैतन्य ऐक्यांत समरसे । मानस त्या योगियाचें ॥ " — ( यथार्थदीपिका ६. ५७६ )

( ३ ) " पुरग्रामीं वागे । नरनारीचे प्रसंगे । सकळांसी तो गोष्टी सांगे । तरी न भंगे समाधी ॥ " — ( शांतिसागर )

( ४ ) " चालतां बोलतां अखंड समाधी ।
कल्पना निमाली ब्रह्मभावें ॥ " — ( श्रीबाबा )

( ५ ) दादू – " अमृतनाम ले, आतमतत पोखे ।
सहजे सहज समाधिमां, धरणी जल सोखे ॥ "

( ६ ) " राम म्हणे करितां धंदा ।
सुख समाधि ते सदा ॥ " — ( तुकाराम महाराज )

( ७ ) " नित्य स्मरणें तुझें नाम । हाचि भक्तांचा जपसंभ्रम ।
तुझें कीर्तन मनोरम । ते समाधि परम भक्तांची ॥ "
— ( एकनाथी भागवत )

असो. याखेरीज श्रीबलभीमबोवा साडेकर यांचे 'समाधि म्हणजे तरी काय, कशाला समाधि म्हणतात' या मुद्द्यांवरील विवेचन अत्यंत उद्बोधक व मननीय असल्यामुळें तें येथें दिल्यावांचून राहवत नाहीं :—

" माझें मीपण मज भेटवुं नेणें । ऐशिया गुरुशीं गुरुत्व बोले कोण ॥ १ ॥ जप तप ध्यान मनाचें विंदाण । निजात्मदर्शन विरळा

**दावी बा ॥ २ ॥ तटस्थ काष्ठी विधि ते नव्हे समाधि । मन मूर्च्छितसे जाण तिये संधी ॥ ३ ॥ मनाचे साक्षीसी मनमनासंयोगें । एकाजनार्दनीं समाधि पायां लागे ॥ ४ ॥ "**

अहो ! समाधि म्हणजे तरी काय ? काया काष्ठवत् होणें, जडासारखें पडणें, पिसेंपणा मिरविणें ? कशाला समाधि म्हणतात ? असा मला आज प्रश्न उद्भवला तों अवचित वरील अभंग नजरेला पडला. त्याचा अर्थ आपणाशिवाय कोण करील ? आणखी समाधि म्हणजे काय ?

**" तरी समाधि ते कैसी असे । तटस्थ काष्ठाचें परी दिसे । कां समाधिस्थ तें केवळ पिस । अथवा असे सज्ञान ? ॥ १ ॥ ×××× केवळ ताटस्थ्या नांव समाधि । म्हणतां ज्ञात्याची ठकली बुद्धी । ते समाधि नव्हे त्रिशुद्धी । मूर्च्छित ते संधी वृत्ति ॥ ६३ ॥ निरभिमान निरवधि । त्या नांव अखंड समाधि । परी काष्ठातें त्रिशुद्धी । नव्हे समाधि सर्वथा ॥ ६४ ॥ ताटस्थ्यची समाधि याचें । जे मानिती त्यासी स्वरूपाचें । ज्ञान नाहीं निश्चयाचें । अनुमानाचें बोलणें ॥ ६५ ॥ प्रचंड आघाताच्या भुलीं । तात्काल तटस्थता बाणली । तरी काय तेणें झाली । सत्याची भली समाधि त्यासी ॥ ६६ ॥ ××××× मिथ्या देहासी तटस्थता । झाल्या मानावी समाध्यवस्था । ऐशीं लक्षणें सत्य मानितां । ठकले तत्त्वतां परीक्षक ॥ ५६ ॥ "**

—(एक० भा० स्कंद ११, अ. १३ श्लोक ३७)

**आशंका :—** कदाचित् अशी शंका सहज येईल कीं, प्राप्तपुरुषास साधनें फोल. तस्मात् तो डोळे झांकून एकाग्रता करणार नाहीं व वरील ओंव्या त्या पुरुषास लागू होत नाहींत. कारण त्यानें काय अभ्यास करावयाचा आहे ? परंतु कर्तृतंत्र साधक असला तर तो एकाग्रता, स्वरूपीं दृढीकरणार्थ करीलच, व त्याचा देह, इंद्रियनिग्रह त्यानें केला असल्याकारणानें, ताठेल व वृत्तींत तन्मयता झाली म्हणजे बाह्यपदार्थाचें स्फुरण त्यास होणार नाहीं व देहाचें भान न राहिल्यामुळें देह अस्ताव्यस्त, इंद्रियें विगलित व काष्ठासारखीं ताठ क्षणभर होतील.

**उत्तर:**—( १ ) साधक स्वरूप जाणून स्वरूपीं अभ्यास करतो. स्वरूप श्रवणमननानें स्पष्ट बाणलें नाहीं तर योगाभ्यासासारखा दुष्कर अभ्यास केला व सिद्धी साधल्या तर निर्फळ आहे. कारण मूढ अवस्थेंतच राहील ( येविषयीं वेदेश्वरी अ० १२ वा वाचावा ).

( २ ) मन फार चंचल आहे. तें स्वरूपीं लाविलेंच पाहिजे. इंद्रियांचा निग्रह करून मन नेहटावें; पण मन स्वयेंच इंद्रियें विगलित पडून स्वतः स्वरूपदर्शन होतांच जाऊन स्वरूपीं मिळेल अशी वार्ता कोठें ऐकिवांत नाहीं. कारण मन स्वरूपीं तन्मय होण्यास फार कठीण आहे. करितां सप्त भूमिका, त्यावर येणाऱ्या अडचणी या सर्व दूर कराव्या लागतात. योगादिकांचे अभ्यास करावे लागतात. मनाला इंद्रियांतून स्वरूपीं नेहटावें लागतें. अशी लाखों प्रमाणें व स्वानुभव आहे.

**"योगी युंजीत सततं आत्मानं रहसि स्थितः ॥ १० ॥"**
—( भगवद्गीता अ. ६ )

( ३ ) बरें, स्वरूपीं मन एकाग्र झालें तर स्वरूपाचा आणि देहाचा कांहीं तादात्म्य संबंध आहे कां ? देह कांहीं स्वरूप नाहीं, स्वरूप देहाच्या आंत बाहेर पण तें देह होईल कां ? तर मग मन स्वरूपीं मिळतांच देह मृतवत् पडेल किंवा इंद्रियें विगलित होतील ?

( ४ ) स्वरूपीं समाधि अवस्थेंत मन मिळतांच त्या स्थितीचा परिणाम अवस्था तरी काय म्हणावी ? "**निद्रादौ जागरस्यांते यो भाव उपजायते । तं भावं भावयन् साक्षादक्षयानंदमश्नुते ॥८॥**"—(योगवा. सार. प्र. १०)

टीका:—**जरी जागृतीच्या अंतीं । आदि प्रवेशू जो सुषुप्ती । तेव्हां इंद्रियवृत्ति उपरमती । इंद्रियें लय पावती बुद्धिंद्रीयवर्गें ॥ ३ ॥ पूर्ण लय तरी नाहीं जहाला । तरी वृत्ति विषयव्यापार टाकिला । हेय-उपादानाचा मेळा । सर्वही गेला वृत्तिपासाव ॥ ४ ॥ जया इंद्रियांच्या ज्या वृत्ति । त्या इंद्रियांमाजी प्रवेशति । इंद्रियें मनामाजी लय पावती । संकल्पवृत्ति मन सांडी ॥ १०५ ॥**

**आशंका :—** इंद्रियें मनांत लय पावलीं असें वर म्हटलें तर तीं गलित झालीं असतील अशी शंका येईल. म्हणून " संकल्पवृत्ति मन सांडी " असे शब्द योजून पुढील श्लोकांत " **प्रशांत सर्व संकल्पा या शिलावदवस्थितिः । जाग्रन्निद्रा विनिर्मुक्ता सा स्वरूपस्थितिः परा** ॥ ९ ॥ " शिलेप्रमाणें संकल्प निश्चल झाला असा याचा अर्थ ध्यावयाचा. " **निचेष्ट अनीह जयापरी । पर्वत राहे जैसा अंतरीं । संकल्पशून्यता शिळेचिये परी । बाह्याभ्यंतरीं अतिशुद्ध** ॥ ६४ ॥ " पुढें श्रीगुरु म्हणतात कीं, " **जडतां वर्जयित्वैकां शिला या हृदयं हि तत् । अमनस्कं महाबाहो मन्मयो भव सर्वदा** ॥ १० ॥ "

टीका :— ' **तरि आतां ऐक गा रघुनाथा । सांडावी शिळेची काठिण्यता । कठिण तें जड अप्रकाशता तत्त्वता । त्यजोनि स्थिरता तैसी घेई ॥ ५५९ ॥ ते जडता टाकूनि शिळेची । तियेचि हृदयस्थिति स्थिरतेची । निघोटपणें स्थिति वस्तूची । सर्वा स्थितींची जननी हे ॥ ५६० ॥ इयेतेंचि नांव अमनस्क बोलिजे । इयेतेचि उन्मनी म्हणिजे । सुलीनता हेचि जाणिजे । सर्वा उपरी जे वरिष्ठपणें ॥ ५६१ ॥** ' यावरून एकंदर विचारानें सहज कळेल कीं, एकाग्रता स्वरूपाचे ठिकाणीं साधक करतो, तेव्हां देह व इंद्रियें विगलित पडण्याचें कारण नाहीं व पडलीं तर ती शुद्ध मूर्च्छा किंवा तटस्थता होय. अहो ! जेथें निद्रावस्था ही उपाधि आहे, कारण तिच्यांत इंद्रियें विगलित होतात, मग काष्ठासारखी स्थिति होणें ही समाधि कोण म्हणेल ?

( ५ ) बरें प्रेमानें विरून जाते असें म्हटलें तर, काय अर्जुनाची वृत्ति, श्रीकृष्णाच्या मुखानें भगवद्गीता ऐकतांना, प्रेमांत विरून जात नसे काय ? पण " **विपायें अहंभाव ययाचा जाईल । मीं तेंचि हा जरी होईल । तरी मग काय कीजेल । एकलेया ॥ दिठीची पाहतां निविजे । कां तोंड भरोनि बोलिजे । ना तरी दाटूनि खेव दीजे । ऐसा कोण आहे ॥ आपुलिया मनाबरवी । असमाई गोठी जीवीं । ते कवणेसी चावळावी । जरी ऐक्य जाहलें** ॥ " असें म्हणून श्रीकृष्ण-

परमात्म्यानें अर्जुनास सावध केलें. "बा! अर्जुना!! सावध हो. तूं स्वरूपीं तन्मय झालास तर मी कोणाशीं बोलूं?" असें म्हणतांच अर्जुन प्रेमावस्था सांवरून घेत असे. समाधि म्हणजे इंद्रियें आपल्या ताब्यांत आणणें. "**इंद्रियें अपैति होती। जयाचे म्हणितलें करिती। तयाची प्रज्ञा जाण स्थिति। पातली असे॥**" पण आपणांस न आटोपतां इंद्रियें प्रेमानें गलित होत आहेत. त्यांसही न सांवरणें हें कांहीं ठीक नाहीं. श्रीमद्भगवद्गीतेंत बोध संपतांच "**पार्थ स्वानंदैकरसें। विरेल ऐसा भेद दशे। आणिला येणें मिषें। प्रश्नाचेनि॥ १५४६॥ पूर्ण ब्रह्म झाला पार्थ। तरी पुढील साधावया कार्यार्थ। मर्यादा श्रीकृष्णनाथ। उल्लंघों नेदी॥ १५४१॥**"—(गी. अ. १८, श्लोक ७२)

यावरून प्रेमभरांत आलेला मुमुक्षु काष्ठवत् पडेल असें दिसत नाहीं; व पडला तरी ती प्रेमानें मूर्च्छना आली व शरीरास इतर कामक्रोधभय यांचा अवचित धक्का लागला म्हणजे जसा त्या शरीरावर परिणाम होतो, बोबडी वळते, शरीर कांपतें, मनुष्य बकूं लागतो, तसा कांहीं प्रकार म्हणावा. श्रवण मनन गुरुसेवा करूं लागलें आणि मध्येंच ताटस्थ्य झालें तर तो विक्षेप होय. यास इंद्रियें सांवरून धरून दाबलें पाहिजे. नाहींतर फुकट मन मूर्च्छित होतें आणि साधकांस वाटतें कीं, 'मी समाधिस्थ होतों.' तर तसें नव्हे. ही गोष्ट साधकाचे ध्यानांत असावी कीं, मला वृत्ति स्वरूपांत मिळविणें आहे व त्याचें अनुसंधान दृढ धरून इंद्रियांचा निग्रह झाला तर मन स्वरूपींच मुरेल. वृत्ति लय पावणार नाहीं. लय झाला तर निद्रा येईल. फार उठाव घेतला तर जागृति. जागृतीच्या अंतीं आणि निद्रेच्या आदि जी स्थिति ती संधिगत अवस्था होय. लय, विक्षेप, ताटस्थ्य, मूर्च्छा वगैरे वृत्तीच्या अवस्था आहेत. समाधि याचा खरा अर्थ समतोल बुद्धि. अहंकाराचा लेश न राहतां आनंद, समाधान सर्वदा असणें या नांव समाधि. "**तुका म्हणे नये जाणीव अंतरा। अंतरि या धारा आनंदाचा॥**"

अस्तु. आतां समाधीचे अनेक प्रकार, समाधीचीं लक्षणें, समाधिस्थांची स्थिति आणि प्राप्त करून घेण्याचे सुलभ उपाय या संबंधींचा सविस्तर खुलासा ह. भ. प. वामन परशराम फणसळकर यांनीं संपादन केलेल्या 'साधन-मुक्तावलि' या ग्रंथांत पुढीलप्रमाणें फार सुंदर केला आहे : —

"विकल्पाचें उठणें राहवें । नुसतें वृत्तिचें स्फुरण उरावें ॥ हेंचि समाधीचें लक्षण जाणावें । राजयोगीयासी ॥ १ ॥ मृगजळापरी वृत्ति उठे । व्यवहारून तात्काळ आटे ॥ सत्य मिथ्या विकारू तुटे । हे सहज समाधि ॥ २ ॥ मन-बुद्धि अंतरीं विहारती । स्वप्नाभासातें उठविती ॥ कीं इंद्रियद्वारा निघोनि क्रीडती । परी समाधि अभंग ॥ ३ ॥ हाही तथा निंदी कीं स्तवी । दूरीं धरी कीं सलगी करी सर्वी ॥ हे आपुले परकी जरी म्हणावीं । परी समाधि अभंग ॥ ४ ॥ मग देह जनीं कीं विजनीं । ग्रामीं पट्टणीं कीं स्मशानीं ॥ एकरूप अखंड समाधानी । या नांव समाधि ॥ ५ ॥ क्षेत्रीं, कुग्रामीं भूमीं, कीं कैलासीं । अंत्यजगृहीं कीं भागीरथीसी ॥ सदा एकरूप निःसंशयेसी । या नांव समाधि ॥ ६ ॥ अर्चनीं कर्मी कीं सगुणध्यानीं । कृष्णादिकीं वेदपठनीं ॥ दुसरा भावचि नुद्भवे मनीं । या नांव समाधि ॥ ७ ॥ पुण्यमार्गी कीं पापमार्गी । स्त्रीसमुदायीं कीं संतसंगीं ॥ दुजी कल्पनाचि नव्हे वाउगी । या नांव समाधि ॥ ८ ॥ देह इंद्रियें किंवा मन । आपुलाले व्यापारीं सावधान ॥ परी समाधान तें परिपूर्ण । या नांव समाधि ॥ ९ ॥ नामरूपाचा उद्भवची न होतां । सर्व आहे कीं नाहीं न स्मरतां ॥ सच्चिद्घनाकार एकरूपता । हेचि निर्गुण उपासना ॥ १०॥ जरी देहादिकांचे व्यापार होती । परी असंग आपण अचळ स्थिती ॥ हेचि सहजसमाधि निश्चितीं । समाधि-उत्थानरहित ॥ ११ ॥ बहु कासयासि बोलावें । जें जें तयाचे प्रारब्धें घडावें ॥ तें तें सुखदुःखही भोगावें । परि समाधि अभंग ॥ १२ ॥ एकदां जी स्थिती बाणून गेली । मग तयाशी शास्त्रें जरी सांगूं आलीं ॥ कीं हे नव्हेचि म्हणतां ही स्थिति जे आपुली । न भंगे ती समाधि ॥ १३ ॥ इतुका निश्चय दृढ बाणला । कीं दुजा भाव नसे भलते अवस्थेला ॥ संशय ब्रह्मांड

बाहेरीं गेला । मूलाज्ञानासहित ॥ १४ ॥ जागृतिं स्वप्न – सुषुप्तिं । चिन्मात्रीं जडली वृत्ती ॥ चित्त-चित्तत्वाची विसरे स्फूर्ति । या नांव मद्भक्ति उद्धवा ॥ १५ ॥ हे माझी आवडती भक्ती । इचें नांव म्हणिजेत चौथी ॥ हें भाग्य आतुडे ज्याचे हातीं । तैं चारी मुक्ति निज-दासी ॥ १६ ॥ भिन्न रूप भिन्न नाम । भिन्न स्थिती भिन्न कर्म ॥ जग देखतांही विषम । मद्भक्तास मद्भावें ॥ १७ ॥ भूतें देखतांही भिन्न । भिन्नत्वा न ये ज्याचें ज्ञान मद्भावें ॥ भजे समान । त्यासी सुप्रसन्न भक्ति माझी ॥ १८ ॥ ज्यासी प्रसन्न माझी भक्ती । त्याचा आज्ञाधारक मी श्रीपती ॥ जो भगवद्भावें सर्व भूतीं । सुनिश्चितीं उपासक ॥ १९ ॥ जैसा जैसा विकल्प क्षीण । तैसा तैसा सामान्य प्रकाशमान ॥ जों जों सामान्य दुणावें आपण । तों तों विकल्प मोडे ॥ २० ॥ ऐसा चिरकाल अभ्यास होतां । जो मागें उगेपणा बोलिला तत्त्वतां ॥ तो समाधियोग बाणें अवचितां । विकल्प जातां निपटूनि ॥ २१ ॥ आणखी निर्विकल्प समाधीची खूण । तियेचें जाण हेंचि लक्षण ॥ विश्व न स्फूरे ब्रह्मेवीण । नित्य चिद्घन तेंचि तें कीं ॥ २२ ॥ परी मन कोंडूनि निवांत राहणें । अंतरीं ब्रह्म-सुख सर्वथा नेणें ॥ ते समाधि नव्हे विटंबणें । वृथा करणें श्रम तोही ॥ २३ ॥

## अभंग

तरी पूर्ण समाधान ते समाधी । तोचि कैसें आधी बोलिजेला ॥ २४ ॥
त्रिविधा प्रीति ती परिपूर्ण आपण । तेंचि समाधान समाधी तो ॥ २५ ॥
आदी अंतीं जैसा मध्यें तैसाचि पूर्ण । तेंचि समाधान समाधी तो ॥ २६ ॥
सर्वही असतां असंग आपण । तेंचि समाधान समाधी तो ॥ २७ ॥
जागर सुषुप्ति स्वप्न एकरूप पाहणें । तेंचि समाधान समाधी तो ॥ २८ ॥
होतांही व्यापार नाढळे आपण । तेंचि समाधान समाधी तो ॥ २९ ॥
पाप-पुण्यामाजि असे जो समान । तेंचि समाधान समाधी तो ॥ ३० ॥
करो न करो जैसा तैसाचि परिपूर्ण । तेंचि समाधान समाधी तो ॥ ३१ ॥
प्राप्ताप्राप्त भोग दोन्हीही समान । तेंचि समाधान समाधी तो ॥ ३२ ॥
त्रिपुटीचें जेथें नोहे उद्भवन । तेंचि समाधान समाधी तो ॥ ३३ ॥

राहो जावो देहो परि पूर्ण आपण । तैंचि समाधान समाधी तो ॥३४॥
भलते अवस्थेसी निःसंग आपण । तैंचि समाधान समाधी तो ॥३५॥

## संप्रज्ञात आणि असंप्रज्ञात समाधी

मनादि इंद्रियद्वारां रिघोन । विषय घेती पूर्ववत् संपूर्ण ॥ परी हे ब्रह्म कीं, जग उद्भवेना भान । हा असंप्रज्ञ समाधी ॥ १ ॥ ओतप्रोत ब्रह्म चिद्घन । निजांगेंचि परी किंचित् नव्हे स्मरण ॥ स्वप्नींही नसेचि भेद भान । हा असंप्रज्ञ समाधी ॥ २ ॥ लय होऊनि जे कां निर्विकल्पता । ते असंप्रज्ञात समाधी तत्त्वतां ॥ आणि उद्भवोनि ही स्थिति एकरूपता । ते संप्रज्ञात समाधी ॥ ३ ॥ नाम रूपें दोहींसि न स्फुरती । येथें भेद नसे संप्रज्ञ असंप्रज्ञासि ॥ संप्रज्ञ समाधीसी ब्रह्मस्फूर्ति । तेही न स्फूरे तो असंप्रज्ञ ॥ ४ ॥ उठे कीं निमे जरी संकल्प । परी नामरूप न स्फुरे कदा अल्प ॥ एकरूप ब्रह्मात्मा सच्चिद्रूप । भलतेही अवस्थे ॥ ५ ॥

## दृश्यानुविद्ध आणि शब्दानुविद्ध समाधी

सर्व दृश्य सानथोर न स्मरतां । अखंड एकरूप तें दृश्यानुविद्धता ॥ शब्दादि चंचळ किमपि नाठवितां । ब्रह्मरूप तो शब्दानुविद्ध ॥ १ ॥ दृश्य पाहतां दृश्य न स्फुरावें । हें दृश्यानुविद्धाचें रूप जाणावें ॥ यासी एक वैराग्य असावें । विवेकासहित ॥ २ ॥ स्फूर्त्यादि चंचळ हे सर्व उठता । हे मी आणि न यावी या सत्यता ॥ मी यांत असूनि स्मरे या परता । हा शब्दानुविद्ध ॥ ३ ॥ एवं दृश्यही पाहत असतां । नामरूप उद्भवतीना तत्त्वतां ॥ हाचि दृश्यानुविद्ध समाधी पहातां । असे एकरूप ॥ ४ ॥

## उत्थानलक्षणें

सदा मज ज्ञानचि स्फुरतसे । आतां अज्ञान कोठें असे ॥ मीच मिळे अखंडैक रसें । हें जाण उत्थान ॥ १ ॥ मीच ब्रह्मानंद सेवित । मीच कीं झालों निवृत्त ॥ मी प्रवृत्तींत असे निवांत । हें जाण उत्थान ॥ २ ॥ मन–बुद्धिसहित इंद्रियें । हे सहसाही सुप्तिपरि

उठों नये ॥ कोणतेंच अंतरीं कळों नये । हेंचि उत्थान ॥ ३ ॥ मी ब्रह्मचि अंगें होईन । येर दृश्यभान त्यागीन ॥ साध्यालागीं साधनें साधीन । हें जाण उत्थान ॥ ४ ॥ स्वरूपानुसंधान कदां न सोडीन । ध्यान मी आपला करीन ॥ सदा अनुसंधानीं बुडी मारीन । हें जाण उत्थान ॥ ५ ॥ आपुले करणीचा साभिमान । येर अवघे निकृष्टजन ॥ मजहून मानी ज्ञाता असे कवण । परी तो भ्रांत अनधिकारी ॥ ६ ॥ उपासनेचा साक्षात्कार । तेणें परमार्थ वाढला दिसे अपार ॥ शब्द-ज्ञानाचि म्हणतसे सार । परी तो भ्रांत अनधिकारी ॥ ७ ॥ रजो-वृद्धीचें कारण । देहीं उपजे ज्ञानाभिमान ॥ पदोपदीं देखिजे दोषगुण । वांछी सन्मान प्रतिष्ठा ॥ ८ ॥ बरें वाईटपण हें उमजतां । सर्व मिथ्यासी येतसे सत्यता ॥ तेव्हां सत्यासि मुखीं न बोलतां । मिथ्यात्व आलें ॥ ९ ॥ बाहेर दिसे सात्त्विक स्थिती । अंतरीं दुर्वासना कामासक्ती ॥ ज्यासि प्रिया आवडे चित्तीं । तो जाण निश्चितीं राजसु ॥ १० ॥ नवल रजोगुणाची ख्याती । ज्ञातेपणें कामासक्ती ॥ नाना भोग वांछी चित्तीं । तेणें रजाची प्राप्ती अनिवार ॥ ११ ॥ तस्मात् साधकें हीं उत्थानें त्यागून । निजांगेंचि व्हावें वृत्तीवीण ॥

अभंग

असंग मी परी व्यापार रहावे । हें रूप जाणावें उत्थानाचें ॥ १३ ॥ वृत्तीहि मुरोनि निर्विकल्प व्हावें । हें रूप जाणावें० ॥ १४ ॥ आत्मा सुखी परी सुखदुःख न व्हावें । हें रूप जाणावें० ॥ १५ ॥ असंग असोनि सर्व संग जावें । ह रूप जाणावें० ॥ १६ ॥ समाधीसि सुख व्यापारीं तें नोहे । हें रूप जाणावें० ॥ १७ ॥ असत्य हें खरें परी सर्व जावें । हें रूप जाणावें० ॥ १८ ॥ मिथ्या असोनिया सत्यत्व कल्पावें । हें रूप जाणावें० ॥ १९ ॥ नामरूपालागीं मनें आठवावें । हें रूप० ॥ २० ॥ अभेदाचे ठायीं भेदचि वाटावें । हें रूप० ॥ २१ ॥ तूं एक मी एक उंचनीच पाहावें । हें रूप० ॥ २२ ॥ हा स्वर्ग हा नर्क वाईट बरें फावें । हें रूप० ॥ २३ ॥ पुण्य तें चांगुलें पाप न घडावें । हें रूप० ॥ २४ ॥ अकर्ता आपण परी करणें नसावें । हें रूप० ॥ २५ ॥ अहंकाराचें कार्य आपुलें माथां घ्यावें । हें रूप० ॥ २६ ॥ ध्येयासि

**सांडोनि आंगें ध्याता व्हावें । हें रूप० ॥ २७ ॥ साध्य असोनिया बळें साधू जावें । हें रूप० ॥ २८ ॥ "**

तसेंच संतदास हिराजी महाराज यांनीं प्रस्तुत विषयाचा ऊहापोह ' ग्रंथ आतमबोध ' नामक ग्रंथांतील तृतीय तरंगांत फार मार्मिक रीतीनें केला आहे. तो तरंग येथें जशाचा तसाच उद्धृत करावासा वाटतो : —

**" श्रीसद्गुरु देवाय नमः । तंव बोले शिष्यशिरोमणि । आशंका निवारल्या कृपादानीं । ऐकोनि आनंद झाला मनीं । परी नये उन्मनी मनासी ॥ १ ॥ कळला विचार स्वस्वरूपाचा । ठाव पुसिला मीपणाचा । परि न जाय स्वभाव मनाचा । इंद्रिय-विषयांचा संग धरी ॥ २ ॥ वेदांतशास्त्र गोष्टी ऐकतां । वाटे समाधान बहु चित्ता । तेथोनिया उठोनिया जातां । जडे अहंता देहभाव ॥ ३ ॥ ज्ञान सांगावया येतें बहुतांपरी । मन निवांत न राहे क्षणभरीं । विषय हिंडे दारोदारीं । साक्ष माझ्या अंतरीं येतसे ॥ ४ ॥ स्वामी तों म्हणती तूंचि ब्रह्म । परी न जाय माझा देहभ्रम । न कळे निजस्वरूपाचें वर्म । कोण कर्म आड आलें ॥ ५ ॥ मी ब्रह्म ऐसें असतां । ब्रह्मासी भ्रम कैसेनि चित्ता । अंधकारें गिळिला सविता । नवलाई तेचि वाटे ॥ ६ ॥ तरी सद्गुरुराया कृपा करोनी । मज भोगवी अखंड उन्मनी । निजसुख देई अंतःकरणीं । सद्भावें चरणीं लागत ॥ ७ ॥ जोंवरी विषयांसी न विटे मन । तंव कैसें होय बा उन्मन । वाया सांगे शब्दज्ञान । नव्हे समाधान कल्पांतीं ॥ ८ ॥ जंव विरक्ति मनासी नये हाता । चित्तासी नये नैराश्यता । वेदांत-शास्त्र निर्माण-कर्ता । जरी जाला विधाता न पावे सुख ॥ ९ ॥ मन इंद्रिय-विषयांसाठीं । आशा लोभ धरोनि पोटीं । कामक्रोधादि महा हटीं । लिंगदेहगांठी वासनामय ॥ १० ॥**

**असुर दोन्ही रज-तम । हेचि पाडिती देहभ्रम । हेचि आड आलें खोटें कर्म । न कळे वर्म सत्त्वाचें ॥ ११ ॥ जाणत असतां आपणासी । देह अहंभावाच्या पडे फांसीं । जैसा राहु आड सूर्यासी । तैसी गति आतमयासी जाणिजे ॥ १२ ॥ मन निवांत राहेल कसें । मदमत्सरादि**

दुराशा विषयपिसें । ब्रह्मरूप स्वतःसिद्ध असे । पडळ येतसे मायेचें ॥ १३ ॥ 'मम माया दुरत्यया' । श्रीकृष्ण सांगे धनंजया । मज शरण येतां माझी माया । न बाधे तया सद्भक्ता ॥ १४ ॥ साधकासी विघ्न थोर । करिती मन इंद्रिय विषयपर । न सुटे देहअहंकार । येथें बलात्कार कोणाचा ॥ १५ ॥ ऐसी कल्पना येईल जरी । तरी ऐकें बापा सांगतों परी । काम क्रोध हे दोन्ही वैरी । आपुले अंतरीं असती ॥ १६ ॥ काम क्रोध मांग महा हट्टी । ऋषि मुनि तप करिताति कोटी । या दोघांसि पाहतां दृष्टीं । तपश्चर्या कोटी बुडविती ॥ १७ ॥ ब्रह्मयासी लाविती कन्येपाठीं । विष्णु वेडावे वृंदेसाठीं । शिवाची फिटे लंगोटी । मोहनी दृष्टीं पाहतां ॥ १८ ॥ ऐसे हे काम क्रोध महा हट्टी । देव मुनि ऋषि सकळ सृष्टि । लुटोनि घेती तपाच्या कोटी । इतरांच्या गोष्टी काय तेथें ॥ १९ ॥ यासी म्हणसी उपाय कोण । तरी नामस्मरण संकीर्तन । प्रेमयुक्त सद्भावें भजन । सद्‌गुरुचरण सेवावे ॥ २० ॥ द्वैत सांडोनी अद्वैत-भजन । शिव विष्णु एकरूप जाणोन । निंदा करितां घडे पतन । समानुभावें-करोनी भजावें ॥ २१ ॥ सदाशिवें जाळिलें कामासी । शिवस्मरणें धाक तयासी । न बाधिती विघ्नें सद्भक्तासी । निष्कामेंसी भजावें ॥ २२ ॥ विष्णूदरीं मन्मथ जाण । विष्णुस्मरणें सुप्रसन्न । कामादिक न करिती विघ्न । प्रेमें भजन करावें ॥ २३ ॥ हरिहरांसी भेद नाहीं । वामसव्य एकांग पाही । द्वैत पाहूं जातां कांहीं । अणुमात्र तेंही दिसेना ॥ २४ ॥ सम चरणासी समान । प्रसन्न देव करितां पूजन । एकासी पूजा एकासी ताडण । होय पतन ते क्षणीं ॥ २५ ॥ एक ईश्वर सर्वांच्या हृदयीं । हें मुख्य भक्तीचें लक्षण पाहीं । ज्ञानविज्ञान लागे त्याचे पायीं । ब्रह्मसुख अक्षयीं जाणिजे ॥ २६ ॥ श्रवण मनन निजध्यास । निशिदिनीं पाहिजे हा अभ्यास । क्षणभरी बसावें श्रवणास । अहंता अंगास जडतसे ॥२७॥ विषयकामना सोडुनी चित्तीं । भजन करावें अति प्रीतीं । सदा धरावी सत्संगती । पालटे मति दुर्जनाची ॥ २८ ॥ चित्तीं धरोनी विषयकाम । भजन करितां सप्रेम । त्यास घाला घालीतसे काम । पडे भ्रम मायेचा ॥ २९ ॥ माया अविद्येस सांडितां । चित्तीं धरावी नैराश्यता । आधीं सोडावी देहअहंता । सद्गुरुनाथा शरण जावें ॥ ३० ॥

अनादि अविद्या माया जीव । देहीं अहंता देहभाव । सांडोनी धरावा सद्वस्तुभाव । कल्पना वाव निरासी ॥ ३१ ॥ आपुली कल्पना शिष्यराया । हेचि जाणिजे मुख्य माया । रूपासवें जैसी छाया । तैसी माया परब्रह्मीं ॥ ३२ ॥ सजीव कीं निर्जीव छाया । निर्जीव म्हणतां चळतसे वायां । सजीव म्हणों जातां छाया । घालितां पाया न तुटेचि ॥ ३३ ॥ अग्नि लावितां न जळे न पोळे । बुडवूं जातां न बुडे जळें । वायुवेगें न उडे न चळे । न टळे दुरी दवडितां ॥ ३४ ॥ न लागे हातीं धरूं जातां । देशदेशांतरीं हिंडतां । नाना उपाय प्रयत्न करितां । पाठी लागतां न सांपडे ॥ ३५ ॥ उभे राहतां जवळी पडे । बैसतां दिसे पैलीकडे । निजोनि राहतां तळीं सांपडे । निजनिवाडे छाया धरी ॥ ३६ ॥ तैसी मायेची व्यवस्था । न लगे अंत पाहूं जातां । कल्पांतीं न सुटे प्रयत्न करितां । कल्पना वाढतां अधिक वाढे ॥ ३७ ॥ ब्रह्मादिक राहिले शिणोन । तेथें इतरांचा पाड कोण । देवादि ऋषि मुनि आदिकरून । माया विलक्षण ईश्वराची ॥ ३८ ॥ माया म्हणिजे वायांचि भास । तूं आत्मा निराभास । करितां कल्पनेचा निरास । माया ब्रह्मास मिळे सहजीं ॥ ३९ ॥ होतां आत्मस्वरूपाचा अनुभव । पाहतां मायेसी न दिसे ठाव । माया ब्रह्मासी नांव । नसे वेगळें पाहूं जातां ॥ ४० ॥ माया स्वभावेंचि शून्य । सर्वां ठायीं एक चैतन्य । चैतन्यावीण दुजें अन्य । नसे शून्य बोलावया ॥ ४१ ॥ जैशा सागरीं जळाच्या लहरी । जळचि लोळे जळावरी । तैसें जग चित्सागरीं । दुसरी परी असेना ॥ ४२ ॥ निवांत राहतां अंतरीं । चिद्रूप सघन सबाह्य अंतरीं । कल्पना स्फूर्तीसी नुरे उरी । लक्ष ईश्वरीं मिळतसे ॥ ४३ ॥ घटाकाश मठाकाश । हृदयीं तैसें हृदयाकाश । आकाररहित महादाकाश । सघन चिदाकाश तयापरी ॥ ४४ ॥ पृथ्वीवेगळा न दिसे घट । तंतूवेगळा न दिसे पट । जैसें जगीं पाहतां घनदाट । स्वरूप निकट चिदाकाश ॥ ४५ ॥ जैसा मच्छ जळाभीतरीं । जळचि त्यास सबाह्याभ्यंतरीं । तैसें जग स्वरूपावरी । चराचरीं व्यापक ॥ ४६ ॥ नाना नगीं जैसें सुवर्ण । तैसें जगीं ब्रह्म सघन । घडामोडीरहित भांगार जाण । अविनाश पूर्ण ब्रह्म तैसें ॥ ४७ ॥ सद्गुरुकृपा होतां जयासी । जगचि ब्रह्म होय

त्यासी । स्वरूपानंद सुखाची राशी । द्वैत स्वप्नासी नये तया ॥ ४८ ॥ सद्गुरुकृपें कळे वर्म । मायाचि रोकडें होय ब्रह्म । सूर्योदयीं जैसा तम । प्रकाश परम होय तोचि ॥ ४९ ॥ सूर्यतेजासी जैसे किरण । दिवस रात्री नोळखे जाण । तैसें ज्ञान परिपूर्ण । बद्धमुक्त जाण न कळे त्यासी ॥ ५० ॥

## प्रक्रिया

निवांतरूप सहजस्थिति । आनंदमय सदा चित्तवृत्ति । एक आत्मा सर्वांभूतीं । इंद्रियें वर्तती निजज्ञानें ॥ ५१ ॥ अंतःकरण मन बुद्धि चित्त अहंकार । नेणती दुजा इतर प्रकार । एकरूप वस्तु चराचर । निवालें अंतर अखंडित ॥ ५२ ॥ पिपीलिका ब्रह्मा धरोनी सर्वा ठायीं । भूतीं भूतात्मा एकचि पाहीं । आपपर ज्यासी उरलेंचि नाहीं । पाहतां पाहणें पाहीं विरालें ॥ ५३ ॥ निवांत झाल्या अंतःकरण । संकल्पविकल्परहित मन । वस्तुवेगळें न दिसे आन । मानापमान सारिखे ॥ ५४ ॥ निंदा स्तुति ऐकतां श्रवणीं । हर्ष विषाद नुचंबळे मनीं । विरताती जनीं वनीं । भोगिती उन्मनी सदा ॥ ५५ ॥ सुखदुःखातें न गणिती । देहीं असोनि विदेह स्थिति । आत्मानुभव सदा चित्तीं । सुखशांति अखंडित ॥ ५६ ॥ वर्णाश्रमाचा पांग । जयासी फिटलासे आवेग । संगीं असोनि निःसंग । वृत्ति अभंग निजरूपीं ॥ ५७ ॥ घरीं द्वारीं अथवा वनीं । तीर्थक्षेत्रीं त्रिभुवनीं । देह वर्ते प्रारब्धेंकरूनी । विकल्प मनीं नुरेचि ॥ ५८ ॥ सदा मोकळी चित्तवृत्ति ! ब्रह्मानंदरूप सहजस्थिति । अखंड समाधि भोगिती । तटस्थ वृत्ति असेना ॥ ५९ ॥ तटस्थता म्हणती समाधी । ते जाणावे हीन बुद्धी । ताटस्थ्य काष्ठवत् उपाधी । मूर्च्छागत संधित्व यापरि ॥६०॥ शेळी देखोनि धामीण सर्पासी । मूर्च्छागत होऊनी पडे भूमीसी । वर्मी लागतां घाय आंगासी । समाधि तयासि म्हणूं नये ॥ ६१ ॥ गोपाळ खेळ करूनी दावीत । वायु ब्रह्मांडीं असे नेत । समाधि लावुनी जनां दावीत । ताटस्थ्य होऊनी बहुत काळवरी ॥ ६२ ॥ बाहेर काढूं जातां जन त्यासी । वायु उतरोनि आंगासी । सावध होऊन देहासी । म्हणे लोकांसी देणगी द्यावी ॥ ६३ ॥ देहीं असतां

समाधि जाण । येथ पाहिजे आत्मज्ञान । सर्वांभूतीं समसमान । निज-आत्मज्ञान अनुभवी ॥ ६४ ॥ आपणावांचोनि दुजें कांहीं । अनंत ब्रह्मांडांत उरलें नाहीं । वस्तु सर्वगत सर्वांठायीं । निवांत हृदयीं समसाम्यता ॥ ६५ ॥ ब्रह्मस्वरूप एकदेशी । वृत्ति लीन चिदाकाशीं । बोलती चालती समाधि ऐसी । सांगे ब्रह्मयासि भगवंत ॥ ६६ ॥ सर्व करोनि अकर्ता । सर्वांभूतीं समसाम्यता । अहंदेहीं नुरे अहंता । समाधि अवस्था या नांव ॥ ६७ ॥ सहजसमाधि ते ऐसी जाण । वस्तुवेगळें न दिसे आन । कल्पनारहित निज–आत्मज्ञान । निर्विकल्प जाण समाधि हेचि ॥ ६८ ॥ चिदाकाश चिदंबर । धरोनि हंस अवतार । ब्रह्मयासी बोधी सर्वेश्वर । करितां सृष्टिव्यापार न बाधे शिण ॥ ६९ ॥ मी कर्ता हे देहअहंता । वायाचि धरिसी कां चित्ता । आपुली पाहे निजात्मता । बोधिला विधाता हंसरूपें ॥ ७० ॥ सुखी झाला तो विरंची । निवांत होऊनी सृष्टी रची । ऐसी कृपा सद्गुरूची । वस्तु आपणचि आंगीं झाला ॥ ७१ ॥ सृष्टी संहारी पाळिता । हरिहरांची ऐसी सत्ता । समाधि न मोडे सर्वथा । नित्यमुक्तता त्या नांव ॥ ७२ ॥ ब्रह्मा सांगे सनकादि–नारदांसी । नारद बोधी व्यासादिकांसी । निज–आत्मरूप समाधि ऐसी । व्यासें शुकासी बोधियेलें ॥ ७३ ॥ सूर्यनारायण सांगे याज्ञवल्क्यासी । तेणें बोधिलें जनकरायासी । राज्य करोनि समाधिसुखासी । विदेही त्यासी नाम झालें ॥ ७४ ॥ वसिष्ठ सांगे श्रीरामासी । सहजसमाधि निजसुखेंसी । राम वधी रावणकुंभकर्णासी । समाधि युद्धींही न मोडे ॥ ७५ ॥ श्रीकृष्ण सांगे पार्थासी । युद्ध करितां समाधि त्यांसी । गीता बोधिली ऐसी । समाधिसुखासि निवाला पार्थ ॥ ७६ ॥ उद्धवासी निजमुखें भागवत । श्रीकृष्ण सांगे यथार्थ । केला शोकविरहित । सहज-समाधिस्थ उद्धव ॥ ७७ ॥ पूर्वील राजे सांगों किती । देव सांगे अर्जुनाप्रती । विवस्वत मनु यथा निगुती । आत्मस्थिती बोधियेले ॥ ७८ ॥ कवि हरी अंतरिक्ष । प्रबुद्ध पिप्पलायन चमस । यदु द्रुमिळ करभाजनास । अखंड समाधिस्थ विचरती ॥ ७९ ॥ इक्ष्वाकु पृथु पुरुरवादिकरून । आत्मज्ञानी सहजस्थिती विचरण । राज्यासन त्यागून । अरण्य सेवोनि राहिले ॥ ८० ॥ श्रीकृष्ण सांगे मैत्रेयासी ।

आज्ञापिलें सहजस्थितीसी । सांगोनि निवविलें विदुरासी । अखंड समाधीसी ठेविलें ॥ ८१ ॥ दत्तात्रेय सांगे गोरखासी । अवधूतगीता निरोपिली ऐसी । आत्मज्ञान सांगे त्यासी । परंपरा ऐसी आदिकरोनि ॥ ८२ ॥ शिव सांगे पार्वतीसी । सिद्धांतज्ञान क्षीरसागरतटासी । तें श्रवण झालें मच्छेंद्रासी । तेणें मीनासि निवेदिलें ॥ ८३ ॥ मीन सांगे चौरंगासी । तेणें सांगितलें गहिनीनाथासि । गहिनी सांगे निवृत्तीसी । सहजसमाधीसी स्थापिलें ॥ ८४ ॥ निवृत्ति बोधी ज्ञानेश – सोपान – मुक्ताबाईसी । ज्ञानदेवें चांगदेवासी । चौदाशें वर्षें त्याचिया वयासी । निषेध करोनि तयासी निवविलें ॥ ८५ ॥

दत्तात्रयें निवविला जनार्दन । त्यासी एकनाथ गेला शरण । निःसीम गुरुभक्तिपूर्ण । ब्रह्मानंदेंकरूनि आनंदला ॥ ८६ ॥ गुरुभक्ति देखोनी । संतोषले चक्रपाणी । बारा वर्षें कावडी घेवोनी । वाहे पाणी घरीं त्याच्या ॥ ८७ ॥ जयपाळ राजा ज्ञानासाठीं । बहुत श्रमलासे पोटीं । न होय ब्रह्मानंद दृष्टीं । षड्दर्शनें कष्टी केलीं त्यानें ॥ ८८ ॥ यालागीं मुकुंदराज अवतार । ज्ञानाब्धि कृपासागर । षड्दर्शनें सोडविले थोर । जयपाळ अंतर निववीलें ॥ ८९ ॥ कैवाड केला मुकुंदराजें । जयपाळासी उपदेशिलें निजगुज । सिंधूमाजी प्रगट केलें वस्तुबीज । जग तारावया ॥ ९० ॥

श्रीशंकर महादेवें । देहापरतें गुज करावें । पार्वतीस केलें ठावें । जग तारावया ॥ ९१ ॥ श्रीशंकराचे पदीं । पार्वतीस लागली समाधी । तुटली जन्ममरणाची व्याधी । येणें जाणें नसे पैं ॥ ९२ ॥ मच्छींद्रनाथ संसार शोधी । हेंचि वस्तु गोरखराज बोधी । हेंचि जीवीं धरुनी खरी । पार जहाला ॥ ९३ ॥ दत्तात्रय महामुनी । समाधिस्थ या निर्गुणीं । ज्ञानमुद्रा लागली जुनाट जुनी । अक्षयपदीं जाहला ॥ ९४ ॥ शुक महायोगी । जुनाट आद्य जोगी । अचळपद भोगी । सहजसमाधि ॥ ९५ ॥ गोरखनाथ आणि चर्पट । हाचि अनुभव बोले निरंजन निपट । शिष्य करुनी अपार खटपट । समाधि अचाट भोगवी ॥ ९६ ॥ कबीर देवें नानका थोर केली कृपा । प्रगट केलें निजस्वरूपा । आणि समाधीच्या महासुखा । प्रगट केलें ॥ ९७ ॥

जालिंद्र थोर फकीर । लिंदीमाजी केलें सहजसमाधि विवर । समाधि दाटली आंत बाहेर । थोर योगी नाम जाहला ॥ ९८ ॥ अर्जुनाचे निजहिता । कृष्णदेवें उपदेशिली गीता । हेचि वस्तु बोधवी अर्जुनाचे चित्ता । जन्ममरण खंडावया ॥ ९९ ॥ कृष्णदेवें थोर केलें कैवाड । हेचि वस्तु बोधवी निजनिवाड । उघडोनि मुक्तीचें कवाड । स्वस्वरूपीं मिळाले ॥ १०० ॥ कृष्णदेवें अक्षय रथ पेलिला । महाभारतीं त्वरेसा उपदेश केला । अर्जुन महाबळी स्वप्नीं जागा झाला । तों भोंवता तया हरि दिसे ॥ १०१ ॥ प्रसन्न झाला वनमाळी । अर्जुनाची चुकविली जन्मपाळी । स्वरूपीं लावुनिया टाळी । राजयोगी करवी ॥ १०२ ॥ कृष्णरूप सांठवूनी डोळा । अर्जुन सहजचि मोकळा । भोगवी सहजसमाधि सोहळा । जन्म तुटे स्वभावें ॥ १०३ ॥ अर्जुन ज्ञानी सारा । पुसे आत्मचर्चेच्या विचारा । प्राप्त केलें थोरथोरां । ते वस्तु मज निरोपिजे ॥ १०४ ॥ श्रीकृष्ण म्हणे रे अर्जुना । त्वां पुशिलें अध्यात्मज्ञाना । परमात्म नसे अधिक उणा । सर्वां समसमानसा असे ॥ १०५ ॥

कृष्ण साधकाचा साधक । शिष्या अर्जुना दावी नवल कौतुक । सहजसमाधीचें महासुख । यथाविधि निरूपिलें ॥ १०६ ॥ कृष्णकृपें परब्रह्म । उद्धवासी निरोपिलें निजवर्म । हरपलें जन्माचें जन्मकर्म । उद्धव केला सुखी पै ॥ १०७ ॥ जाणोनि उद्धवाच्या भावा । कळवळला कृष्णदेवा । भागवतीं सांगितला निजठेवा । जग तारावया ॥ १०८ ॥ उद्धव बोले अध्यात्माची मात । कृष्ण सांगे सिद्धांताचा सिद्धांत । वस्तु देखावी निजनयनीं एकांत । गुप्तरूपें ॥ १०९ ॥ दत्त गोरख देव । हाचि बोलिजे अनुभव । सकळ ऋषि आणि महादेव । वस्तुखूण बाणे सकळ शास्त्रीं ॥ ११० ॥ हें प्राप्त व्हावया कारण । सद्गुरूला अनन्यभावें जावें शरण । तंवचि हें कळेल वर्म । येरव्हीं हें कळेना दुर्लभचि ॥ १११ ॥ ऐसी अखंड समाधि सहज-स्थिती । जडभरतादि सिद्धांतज्ञानी त्रिजगतीं । महर्षि आदिकरोनी सांगों किती । लेखा न येती बोलावया ॥ ११२ ॥ ही आतमखूण रूप सर्वगत । ऐसें जाणोनी अनुभवयुक्त । निजसुखेंसी विलसत । राहें निवांत हृदयीं ॥ ११३ ॥ बाळा तुजवांचोनि कांहीं । अनुभवें

**पाहें अणुमात्र उरलें नाहीं । अनंत ब्रह्मांडांत पाहीं । सर्वांठायीं तूंचि एक ॥ ११४ ॥ सनातन आधुनिक बहु संतांचें भोजन उष्टें । मज बोलावया नाहीं कष्ट । आतमबोध ग्रंथीं मी स्वानुभवें केलें स्पष्ट । श्रीसद्गुरुकृपाबळें ॥ ११५ ॥"**

## ( १३ ) ज्ञानपरिपाकाचें सुगम साधन

समाधीचें खरें स्वरूप कळल्यानंतर तें समाधिसुख कसें प्राप्त करून घ्यावें अर्थात् सद्गुरुमुखानें अनुभवजन्य ज्ञान झाल्यावर तें बाणण्यासाठीं म्हणजे जीवन्मुक्तदशा प्राप्त करून घेण्यासाठीं साधकानें काय केलें पाहिजे असा प्रश्न स्वाभाविकच उद्भवतो. त्याचें उत्तर सर्व थोर संतविभूतींनीं एकच दिलें आहे; आणि तें म्हणजे सद्गुरूच्या केवळ कृपाप्रसादेंच ही स्थिति प्राप्त करून घ्यावयाची आहे ( **सद्गुरूची कृपा झालिया पूर्ण । जनचि होय जनार्दन । मग जन वन विजन । भिन्नाभिन्न भासेना ॥** — एकनाथ महाराज ) आणि हेंच पुढील संतोक्तींवरून अति स्पष्ट होत आहे :—

### ( १ ) श्रीज्ञानेश्वर महाराज —

**स्थिरावल्या वृत्तीचें चिन्ह । अन्यथा नाहीं साधन । जे वंदावे चरण । श्रीसद्गुरूचे ॥; निवृत्तीश-चरणवंदन । प्रसाद परम गहन । राहिलों कूटस्थ होऊन । गुणातीत ॥** –( स्वात्मानुभव ); **मनाचा मारू न करितां । इंद्रियां दुःख नेदितां । एथ मोक्षु असे आइकतां । श्रवणामाजि ॥** –( ज्ञानेश्वरी ).

### ( २ ) श्रीएकनाथ महाराज —

**सकळा साधनां श्रेष्ठ साधन । शिष्यासी सद्गुरूचें भजन । तेणें पाविजे ब्रह्मसमाधान । सत्य जाण उद्धवा ॥ जो भावें भजे गुरुचरणीं । तो नांदे सच्चिदानंदभुवनीं । हे सत्य सत्य माझी वाणी । विकल्प कोणी न धरावा ॥ यालागीं तो निर्विकल्प असो । अथवा सत्कर्माचरणीं वसो । सविकल्पें अथवा उगाचि बैसो । परी गुरुभजनीं पैसो**

**बुद्धि त्याची ॥ तऱ्ही हाचि हा सर्वत्र आपण । करणीं अकरणीं नव्ह न्यून । म्हणोनि मुख्य समाधि गुरुभजन । तेंचि आपण सर्वदा करी ॥**–(एकनाथी भागवत).

**( ३ ) श्रीसमर्थ रामदासस्वामी—**

**श्रवणें होये कार्यसिद्धी । श्रवणें लागे समाधी । श्रवणें घडे सर्व सिद्धी । समाधानासी ॥ सत्संगावरी श्रवण । तेणें कळे निरूपण । श्रवणें होईजे आपण । तदाकार ॥ श्रवणें घडे उपरती । बद्धाचे मुमुक्षू होती । मुमुक्षाचे साधक अती । नेमेसि चालती ॥ साधकाचे होती सिद्ध । आंगीं बाणतां प्रबोध । हें तों आहे प्रसिद्ध । सकळांस ठाउकें ॥ संदेह जन्माचें मूळ । तें श्रवणें होये निर्मूळ । पुढें सहजचि प्रांजळ । समाधान ॥**–(दासबोध).

**( ४ ) श्रीतुकाराम महाराज—**

**उघडी समाधि हरिकथासोहळा । नर नारी बाळां लहानथोरां ॥**
—(गाथा).

**( ५ ) श्रीवामनपंडित—**

**गुरुपासूनि घ्यावें ज्ञान । मग तो ईश्वर म्हणोनी त्याचें भजन । त्या भजनें बाणतसे समाधान । जें उपदेशिलें, तें ज्ञानचि बिंबतें श्रुति म्हणे ॥; ऐशा श्रवणेंचि शहाणे । पक्कज्ञानी झाले सर्वही ॥**
—(यथार्थदीपिका).

**( ६ ) श्रीनारायण महाराज** ( जालवणकर ) —

**हेच परमार्थाची खूण । प्रेमें सेविजे सद्गुरूचरण । तरीच निजानंदीं निमग्न । होइजे शिष्यें ॥**—(परमार्थदीपिका).

## ( १४ ) धर्ममेघसमाधि

ज्ञानोत्तर अर्थात् मुक्तीवरील भक्तीच्या परिपाकानें प्राप्त होणाऱ्या अशा या सर्वांत श्रेष्ठ समाधीचा उल्लेख 'पातञ्जलयोगसूत्रां'त 'धर्ममेघसमाधि' या नामाभिधानानें झालेला आढळतो. ज्ञानोत्तरभक्तिपरायण आचार्य

आपल्या अमृततुल्य वाणीनें ज्ञानोत्तरभक्तीची वृष्टि सद्भक्तांवर अखंड करीत असतात. तिच्या योगानें असे सद्भक्त अनादि श्रीवैकुंठांत श्रीनारायणाच्या दिव्यचरणीं गंगा-सागर-संगम-भक्तियोग करून अखंडानंदानुभवाचा लाभ घेत असतात.

वरील १३ व्या समासांत व ग्रंथारंभीं 'मुख्य समाधि गुरुभजन' या शीर्षकाखालीं दिलेल्या अनेक संतवचनांवरून गुरुभजनाचें महत्त्व किती आहे हें सूज्ञ वाचकांच्या लक्षांत येऊन चुकलेंच असेल. ज्ञानोत्तरभक्तीनंतर होणाऱ्या या गुरुभजनाचें पर्यवसान पराभक्तींत* होत असून श्रीवैकुंठपदप्राप्ति हें या परमभक्तीचें श्रेष्ठ फळ आहे (**यद्गत्वा न निवर्तंते तद्धाम परमं मम** — श्रीमद्भगवद्गीता).

---

* श्रीवामनपंडितांनीं श्रीमद्भगवद्गीतेच्या अठराव्या अध्यायांतील ५४ व्या श्लोकाच्या '**भूतेषु मद्भक्तिं लभते पराम्**' या अंतिम पदाच्या विस्तृत टीकेंत या पराभक्तीचें स्पष्टीकरण केलें आहे, तें असें :—

**" अगा ! ब्रह्मभूत योगी जो जाला ब्रह्म, । तो सर्वत्रही स्वयें सम, । आणि भूतांचे ठायीं परम । भक्ति माझी पावतो ॥ " समः सर्वेषु भूतेषु " म्हणोनी । " ब्रह्मभूतत्व " या दों पदेंकरूनी । बोलोनी भक्ति येथुनी । सांगतो कीं, " भूतेषु मद्भक्तिं लभते पराम् " ॥ सर्वांच्या ठायीं सम, । म्हणजे सर्व मायिक जें विषम, । त्या विषमांत सम जें ब्रह्म, । तें स्वयें जो जाला ॥ तरंग सर्व विषम, । त्यांत सागरची एक सम, । परी तरंगही महिमा पावे परम, । जो समरसे सागरीं सर्वसमीं ॥ ऐसा देहधारी विषम । त्यांत सम एक जें ब्रह्म, । त्याचें जो पावला ऐक्य परम, । तोही सम सर्वांविषयीं बोलावा ॥ ऐसा तो ब्रह्मभूत, । अनुभव ज्याचा ऐसा अद्भुत, । तो देखतो कीं, सगुण भगवंत । हींची भूतें ॥ भगवत्पदें षड्गुण । तो चराचर भूतरूपच सगुण । भूतांच्या ठायीं मद्भक्ति पावतो म्हणतां खूण । स्वयें भगवंत ऐसी सुचवी ॥ कीं मद्भक्ति म्हणजे मी भगवंत, । त्या माझी भक्ति पावे ब्रह्मभूत, । यावरूनी बोले अनंत, । कीं मद्भक्ति म्हणजे भगवद्भक्ती ॥ आणि भगवन्नामेंची हे गीता । भगवद्गीता म्हणूनी प्रसिद्धता, । आणि श्रीभगवानुवाच ऐसें तत्त्वतां । भगवत्पदेंची वक्तृत्व गीतेचें ॥ तो स्वयें म्हणे,**

आतां ज्या भागवतधर्माच्या आचरणानें भक्तांस सगुणमोक्ष प्राप्त होतो, त्यास ‘ शाश्वत ’ असें श्रीमद्भगवद्गीतेच्या १४ व्या अध्यायाच्या ‘ ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहम् ’ या शेवटल्या श्लोकांत म्हटलें आहे. त्याच्या टीकेंत श्रीवामन-पंडित म्हणतात :—

**“ अतएव जे आचरतां भागवतधर्म । मोक्ष पाविजे शाश्वत सधर्म । तो म्हणावा शाश्वतधर्म । प्रतिष्ठा त्याचीही मी म्हणे ॥ ज्याणें भागवतधर्म केला । तो सगुणमोक्षास गेला । तो धर्मही सांगातेंची नेला । कीं शुद्धसत्त्वेंची सारूप्य ॥ याच शुद्धसत्त्वेंकरूनी । सर्व वासुदेव म्हणोनी । या अनुभवें प्रारब्ध सारूनी । तें सत्त्व पावलें सारूप्य ॥ तों तेथेंही तोची अनुभव । अखंडानंदवैभव । निर्गुण-मोक्षासारिखा अभाव । नव्हे अनुभवाचा ॥ तो अनुभव शाश्वत । तेव्हां भागवतधर्म शाश्वत निश्चित । त्याचीही प्रतिष्ठा म्हणे भगवंत । मीच म्हणोनी ॥ आतां एकांतिक सुख अत्यंत । जेथें एका स्वरूपीं सकळां वृत्तींचा अंत । त्याचीही प्रतिष्ठा म्हणे भगवंत । मीची म्हणोनी ॥ कीं अखंड निर्गुणानुभव । हेंचि सगुणाचें वैभव । म्हणूनी मीची देवाधिदेव । प्रतिष्ठा त्याही सुखाची ॥ विद्येचा विलास**

---

“ भूतेषु मद्भक्तिं लभते ” । आणि परा उत्कृष्टा, कीं, पक्वज्ञानें लभ्य होते, । ऐसी भगवद्वाणी बोलते । भगवद्भक्ति ब्रह्मभूतांतें ॥ कीं, जों नव्हे ब्रह्मभूत, । तों हे न घडे पराभक्ति अद्भुत, । जो जाला सकळ भूतें स्वयें, तोची निश्चित । मद्भक्ति सर्वांभूतीं पावतो ॥ “ भूतेषु ” म्हणतां सर्वांभूतीं, । “ मद्भक्ति ” म्हणतां भक्ति भगवंतीं, । म्हणजे षड्गुणत्व जें अनंतीं, । तें भूतेंची हीं ॥ तरी अवघीं अनंत नांवें श्रीनिवासाचीं, । सर्वेही मुक्तिप्रदचीं साचीं । तथापि ‘ श्रीभगवानुवाच ’ म्हणुनीच व्यासाची । वाणी प्रतिपदीं बोलते ॥ कीं, वैभव षड्गुण, । हीं भूतेंची आपण सगुण, । उपदेशांत ऐसी खूण । भगवंत या गीतेंत बोलतो ॥ म्हणूनी नाम भगवद्गीता, । न म्हणती कोणी कृष्णगीता, । अथवा गोविंदगीता, अनंतगीता, । अच्युतगीता, न म्हणती पुराणें ॥ अतएव या गीतेमध्यें भगवंत । ज्ञानी आणि भक्त तोची थोर म्हणतो अत्यंत, । एवं उत्तम भक्त तोची जो भागवत । भगवद्रूप जग आपणामध्यें पाहतो ॥ ”

**जितका । सगुणविद्योपाधीच तितका । तेव्हां निर्विशेषसमाधिप्रतिष्ठा त्या एका । शेषपर्यंकावीण दुजा असे कवण ? ॥ ”**

याचें कारण भक्तांचा वैकुंठांतही कायम टिकणारा ‘ अखंडानंदानुभव ’ हें होय. तेथें घडणाऱ्या अशा चरमभक्तीस ‘ गंगा-सागर-संगमा ’ची श्रुत्यादिकांनीं उपमा दिली आहे. हीच भक्ति कुंतीनें श्रीकृष्णांपाशीं ‘ त्वयि मेऽनन्यविषया ’ या श्रीभागवताच्या श्लोकांत व गुरुवर्य श्रीभाईंनीं श्रीबाबांपाशीं ‘ गंगा-सागर-रीती भक्ति मज द्यावी ’ या ‘ श्रीशंकरसुधे’ तील अभंगांत मागितली आहे.

या गंगा-सागर-संगमरीत्या भगवद्भक्तीचे सोहळे ज्ञानीभक्त अनादि परमानंदरूप श्रीवैकुंठांत अखंड भोगीत असतात. वैष्णवांचा ‘ माधूर्यरस ’ तो हाच होय.

पतंजली आपल्या योगसूत्रांत उपरिनिर्दिष्ट ‘ धर्ममेघसमाधि ’संबंधीं म्हणतात :—

**“ प्रसंख्यानेऽप्यकुसीदस्य सर्वथा विवेकख्याते धर्ममेघः समाधिः ॥ २९ ॥ प्रसंख्यानं विवेकसाक्षात्कारस्तत्रापि योऽकुसीदो वार्धुषिकवत्सर्वभावाधिष्ठातृत्वादिरूपां सिद्धिं न प्रार्थयते तस्य योगविघ्नाभावेन सर्वथा निरन्तरं विवेकख्यात्युदयाद्धर्ममेघनाम्नी संप्रज्ञातस्य पराकाष्ठा भवतीत्यर्थः । उत्तमं योगजधर्मं मेहति वर्षतीति धर्ममेघः ॥ २९ ॥”**

**भाषांतर :—** प्रसंख्यात म्हणजे ( ज्यांना ) विवेकाचा साक्षात्कार झाला आहे अशा योग्यांतसुद्धां जो अकुसीद म्हणजे व्याजबट्टा करणाऱ्या सावकाराप्रमाणें सर्व भावां ( भागां ) वर सत्ता असावी अशी हांव ठेवून त्याची सिद्धि इच्छीत नाहीं, त्याच्या योगाभ्यासांत कधींही विघ्न येत नसल्यामुळें, सदोदित विवेकख्यातीचा उदय होतो. नंतर त्यास

'धर्ममेघ' नांवाची संप्रज्ञात* समाधीची उच्चतर अवस्था प्राप्त होते. उत्तम योगाभ्यासापासून उत्पन्न होणाऱ्या धर्मांचा (जो मेघ) वर्षाव करतो त्यास धर्ममेघ असें म्हणतात. (अशी या शब्दाची व्युत्पत्ति आहे).

—(वे. शा. सं. विष्णु वासुदेवशास्त्री पणशीकर.)

शांडिल्यानींही आपल्या '**तत्परिशुद्धिश्च गम्या लोकवल्लिंगेभ्यः**' या सूत्रांत या श्रेष्ठतम ज्ञानोत्तर पराभक्तीच्या बाह्यलक्षणांचा उल्लेख केला आहे, तो असा:—

"ज्याप्रमाणें प्रापंचिक मनुष्यांच्या प्रीतीचें मान, त्यांचें भाषण, त्यांच्या नेत्रांतून वाहणारे अश्रु व त्यांना येणाऱ्या आनंदाच्या उकळ्या

---

* संप्रज्ञात व असंप्रज्ञात समाधींची साधुसंतांनीं केलेली व्याख्या:—

(१) परमपूज्य तीर्थरूप गुरुवर्य श्रीरामचंद्र शंकर टाकी ऊर्फ श्रीभाई आपल्या 'पुरुषार्थदीपिके'त म्हणतात:—

'श्रीमद्भगवद्गीतेच्या सहाव्या अध्यायांतील '**युंजन्नेवं सदात्मानं योगी विगत-कल्मषः। सुखेन ब्रह्मसंस्पर्शमत्यंतं सुखमश्नुते॥**' या श्लोकांत व्यतिरेकयोगाची सिद्धी बोलून जीवन्मुक्तिपद देणाऱ्या अन्वययोगाचें त्याच्या पुढील '**सर्व भूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि। ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः॥**' या श्लोकांत वर्णन केलें आहे. पूर्वील योगास 'निर्विकल्पयोग' किंवा 'असंप्रज्ञात समाधि' व अलीकडील योगास 'सविकल्पयोग' किंवा 'संप्रज्ञात समाधि' असें म्हणतात."

(२) **पाहतां ध्येय ध्याता ध्यान। जेथ उल्हासे त्रिगुंतलें मन। ते संप्रज्ञात समाधि जाण। गुणेंवीण भोगिती॥** —(एकनाथी भागवत).

(३) **आतां संप्रज्ञात असंप्रज्ञात। समाधिभेदें ऐसें बोलत। आत्माकार वृत्तिक असतां चित्त। अनुभवित साक्षी यासी॥ हें संप्रज्ञाताचें लक्षण। असंप्रज्ञात तें एवंविध जाण। सर्व वृत्ति निरोधिलिया मन। स्वयेंचि आपण उपशांत होय॥**—(चित्सदानंदलहरी).

(४) **अहं ब्रह्मास्मि ब्रह्माहमस्मि। येथींचा अर्थ ब्रह्मचि मी। ऐसें अन्वय-व्यतिरेकें ब्रह्मचि मी। ऐक्य बोलती श्रुतिद्वय॥ ऐसा अखंडार्थ। हाचि समाधी संप्रज्ञात। ऐसें बोले वेदांतसिद्धांत। बाह्य उभउनी॥**—(विवेकसिंधु).

ह्यांवरून ताडतां येतें, त्याप्रमाणेंच भक्ताचें ईश्वरावर असलेल्या प्रेमाच्या शुद्धतेचें मान त्याच्यामध्यें दिसून येणाऱ्या अशाच बाह्यलक्षणांवरून ठरवितां येतें. " —**शांडिल्यसूत्र-भाष्य ( श्रीस्वप्नेश्वर )**.

बनारस-काशी येथील गोविंदमठाचे **स्वामी श्रीस्वतंत्रानंदा** यांचा पार्ले ( मुंबई उपनगर ) येथील संन्यासाश्रमांत कांहीं दिवस मुक्काम होता. ते जोगेश्वरी येथील सद्भक्ति-मंदिरांत दि० ४–१–१९५२ रोजीं आल्यावेळीं आपल्या भाषणांत पराभक्तीचे विवेचन करतांना म्हणाले :—

" अत्र ' परां भक्तिं लभते ' इसमे ' परां 'का अर्थ जिसका विनाश नहीं अैसी भक्ति। पराभक्ती ये ज्ञानोत्तर भक्ति है, भक्तीकी पराकाष्ठा है। जब बुद्धि परमात्मारूप बन जाती है तब उसको अखंड ' धर्ममेघ ' समाधि कहते हैं। अेकांतमें जानेसे अथवा हटयोग करनेसे सच्ची समाधि मिलती नहीं। बाहरकें विषयोंमेंसे मन आकृष्टकर निकालकर जब वह परमात्मारूप हो जाता है तब उस अवस्थाको समाधि कहते हैं। जब अैसी अखंड परमात्माकार वृत्ति बन जाती है तब गद्‌गद्‌भाव, अश्रुपात इत्यादि सात्त्विक भाव पैदा होते हैं। उसीको उन्नत भक्ति कहते है यही उन्नत कोटीकी समाधि है। "

## ( १५ ) थोडेंसें सिंहावलोकन

सर्व बाह्यपदार्थांचें विस्मरण होऊन सत्त्ववृत्ति ब्रह्माशीं समरस झाल्यावर अर्थात् ऐक्य पावल्यावर ( **सकळांची जे विस्मृती। तेचि आनंदाची स्थिती।** —आनंदसागर ) अहंभाव नाहींसा झाल्यामुळें पाण्यांतील मोत्याप्रमाणें§ बाहेरील जाणीवच राहत नाहीं.

श्रीवामनपंडितांना मलयाचलीं सद्गुरु श्रीसच्चिदानंदयतींची भेट होऊन, स्वरूपबोध झाल्यावर त्यांना जी समाधि लागली तिचें वर्णन, ' भक्तमंजरी-

§ पुढें सर्व विस्मृत्या बुद्धिवृत्ति ब्रह्मसमरस झाली म्हणजे अहंधर्मरहित, जलनिमग्न मौक्तिकवत्, बाह्य आत्मवेद्य राहत नाहीं. —(**समाधितत्त्वोपदेश.**)

मालेंत ' पुढील ओंव्यांत आलें असून त्यांना ' **दिनत्रय तटस्थता** ' प्राप्त झाली असें श्रीराजाराम प्रासादी म्हणतात :—

**" मग तात्काळ येऊनि जवळीं । दृष्टिपात केला तये वेळीं । मंत्र सांगुनि श्रवणकमळीं । निजात्ममेळीं मेळविलें ॥ मस्तकीं ठेवितां वरदकर । स्वरूप दाटलें सबाह्य सारें । विरोनि गेलें जेथें अंबर । तो विचार काय बोलूं ? ॥ उन्मनी स्थिति प्राप्त जाहली । देहस्मृति मावळली । स्वयंज्योति उगवली । निशी गेली द्वैताची ॥ तेथें हारपलीं दृश्य-उडुगणें । मिथ्या भास सकळ जन । ज्ञानसूर्य उदेला पूर्ण । भक्तिकिरणें ज्यामाजीं ! ॥ सहजसमाधि आपींआप । बाणोनि गेली सद्गुरुकृपें । द्वैततमाचा जाहला लोप । उजळिला दीप सोऽहंतेचा ! ॥ दिनत्रय तटस्थता । वामनस्वामींसी जाहली तत्त्वतां । नंतर श्रीगुरूंनीं थापटितां । तूर्यावस्था प्राप्त जाहली ॥ इंद्रियें सकळ स्वकर्मीं । प्रवर्तले आपुल्या धर्मीं । सद्गुरूचे पादपद्मीं । निजप्रेमीं विनटले ॥ यथाविधि करूनि पूजन । आरंभिलें पूर्ण स्तवन । अनन्य-भावें वामन । जाहाले तल्लीन गुरुपायीं ॥ "**

पुढील उताऱ्यांत श्रीसोहिरोबानाथांच्या व श्रीजनार्दनस्वामींच्या प्रबोध-काळच्या स्थितीचें जें अनुक्रमें वर्णन आलें आहे, त्यावरून या उभयतांनाही उपरिनिर्दिष्ट तटस्थावस्थेंत कांहीं काळपर्यंत* रहावें लागलें, हें स्पष्ट होत आहे. इतकेंच नव्हे तर, शेवटीं जो श्रीभावार्थरामायणांतील उतारा उद्धृत करण्यांत आला आहे त्यावरून, पूर्णब्रह्म अशा **श्रीरामचंद्रप्रभूंनाही समाधिकालीं हें ताटस्थ्य प्राप्त झालें होतें,** असें दिसून येतें :—

( १ ) **" येकत्र होतां उभयदृष्टी । हारपोनि गेली सहजीं त्रिपुटी । मंत्रोपदेश कर्णपुटीं । कृपादृष्टि नाथजींची ॥ पद्मकर तो पडतां**

---

* " या स्थितींत श्रीरामचंद्रप्रभु दहा दिवस राहिले होते. श्रीरामकृष्ण परमहंस तीन दिवस या स्थितींत होते. कित्येक मुमुक्षु कांहीं तासच राहतात. श्रीशंकराचार्यांच्या म्हणण्याप्रमाणें मुमुक्षु एक क्षणभरही या स्थितींत राहिला तरी पुरे आहे. " — ( **पुरुषार्थदीपिका.** )

**शिरीं । देहभान कैचें शरीरीं । तटस्थता वरिली बरी । नाहीं सरी दुजी तया ॥ घेरिला सोहिरा महाभूतानें । अचेतन पडला सहजीं जाणें । अलक्षमुद्रा बाणली पूर्णपणें । कोण जाणे तया सुखा ॥ "**

—(राजाराम प्रासादी.)

( २ ) "**तो बोधु आकळितां मना । मन मुकलें मनपणा । अवस्था नावरेचि जनार्दना । मूर्च्छापन्न पडियेला ॥ त्यासी सावध करूनि तत्त्वतां । म्हणे प्रेमा राहे सत्त्वावस्था । तोहि गिळोनि सर्वथा होयीं वर्तता निजबोधें ॥** " —(एकनाथ महाराज.)

( ३ ) "**होतां स्वरूपीं भेटी । चित्त चैतन्या पडली मिठी । हर्षबाष्प दाटलें कंठीं । आनंद पोटीं न समाये ॥ आनंद हृदयीं न माये । तो नेत्रीं उलथूं पाहे । पूर्ण दाटला विस्मयें । देहाची सोय स्फुरेना ॥ प्राण पांगुळला जेथींचा तेथ । कंठ जाहला सद्गदित । इंद्रियें उपरमलीं समस्त । पाडिलें ताटस्थ्य चिद्रूपत्वें ॥ सर्वांगीं रोममुळीं । आली स्वेदकणिका निर्मळी । मुक्तमोतियांची जाळी । पांघुरविली निजसत्त्वें ॥ निःशेष नाठवे मीतूंपण । खुंटली वाचा पडिलें मौन । जीवशिवाचें पुसिलें भान । चित्त समाधान पावलें ॥** "

—(एकनाथ महाराज.)

वरील तीन्ही उताऱ्यांत वर्णिलेल्या तटस्थतेचा विचार केला असतां, याच तटस्थतेविरुद्ध जीं संतवचनें पूर्वी देण्यांत आलीं आहेत, तीं सर्व चुकीचीं आहेत कीं काय असा सहजच प्रश्न उद्भवतो. त्याचें उत्तर 'मुळींच नाहींत,' असेंच मिळेल. मग सकृद्दर्शनीं हे दोन्ही सिद्धांत जे परस्परविरोधी दिसतात त्यांची वाट काय? तर हे दोन्ही सिद्धांत खरे असून त्यांत मुळींच विरोध कसा नाहीं, तें आपण आतां पाहूं.

सद्गुरुकृपेनें आत्म्याचें प्रथम दर्शन होतांच शिष्य विस्मित होतो व त्याला ही तटस्थता प्राप्त होते, हें वर दिलेल्या तीन्ही उताऱ्यांवरून अगदीं स्पष्ट होत आहे ( **स्वस्वरूप देखतां प्रथम दृष्टीं । न संवरतु विस्मयो उठी ।; अकस्मात अवचितां । दिव्य स्वरूप देखतां । आश्चर्यें**

**झाली तटस्थता ।** — एकनाथी भागवत ). परंतु, हा विस्मय पोटीं जिरवून त्यानंतर जी अवस्था प्राप्त होते, जी स्थिति प्राप्त होते, ती निर्विकल्प समाधि होय [ **तोही** ( विस्मयो ) **जिरवूनियां पोटीं । दशा जे उठी ते समाधि ॥; तोही** ( सत्त्व ) **गिळोनी सर्वथा । होयीं वर्तता निजबोधें ॥** — एकनाथी भागवत ]. आतां ज्या पुरुषास असा अनुभव* प्राप्त होतो, तो जन्मांतरींचा योगभ्रष्ट असल्यास त्याला 'अपरोक्षज्ञान' होतांच तें बिंबतें व पूर्वजन्माभ्यासेंकरूनच त्यास सिद्धदशा प्राप्त होते ( **कीं साधक जन्मांतरीं । योगभ्रष्ट असिला जरी । ज्ञान होतांच तदुपरी । त्याचें स्वरूपीं चित्त थारेल ॥** — वामनपंडित ); परंतु, जो या जन्मींचा शुद्धमति असेल त्यास आत्मज्ञान झाल्यावर स्थिति बाणण्याकरितां ध्यानाभ्यास केलाच पाहिजे. नाहींतर त्याचा पुनर्जन्म चुकणार नाहीं ( **साधनेंविण व्रत होतां । लागों पाहे देह-ममता । आळस प्रबळे तत्त्वतां । ब्रह्मज्ञानमिसें ॥ परमार्थमिसें अर्थ जागे । ध्यानमिसें निद्रा लागे । मुक्तिमिसें दोष भोगे । अनर्गलता ॥ निरूपणमिसें निंदा घडे ।**

* असा अनुभव प्राप्त झालेले महात्मे आपापल्या पूर्वसंस्कारानुरूप जगतांत कसे वर्तताव तें "साधुसंतांचा देवयानपंथ" या ग्रंथांत इस्लामपूरचे डॉ. वैद्य पुढीलप्रमाणें सांगतात :— "तत्त्वज्ञानाच्या भूमिकेंत खोल शिरून ज्ञानधनाचा ठेवा सांपडतांच कित्येक हर्षातिरेकानें तेथेंच आनंद उपभोगीत, जडमूढ होऊन पडून राहतात. त्यांना जगाची फिकीरही असत नाहीं. दुसरे हा ठेवा सांपडतांच आनंदानें उन्मत्त होऊन देहाचा एकदम त्यागच करतात व अशा प्रकारें स्वस्वरूपीं लीन होऊन अखंड आनंदाचा उपभोग घेत राहतात. कित्येक लहान मुलांप्रमाणें निर्विकार अशी बालवृत्ति धारण करून देह असेपर्यंत संचार करीत असतात. आणखी कित्येक हा ठेवा सांपडतांच आनंदानें बेहोष होऊन तसेच वागतात. त्यांची वर्तणूक जगांत पिशाचवत् आढळून येते ! कित्येक मात्र असे असतात कीं, हा ज्ञानाचा ठेवा सांपडला तरी निरतिशयानंदामुळें बेहोष न होतां अगर त्या आनंदांतच गढून न राहतां, तो ठेवा संपूर्ण प्राप्त करून घेऊन त्याचा नित्य उपभोग घेतात. एवढेंच नव्हे तर जगाच्या कल्याणाकरितां दुसऱ्यासही तो देत असतात ! वर वर्णन केलेल्या सर्व प्रकारच्या

**संवादमिसें वेवाद पडे । उपाधीमिसें येऊन जडे । अभिमान आंगीं ॥ तैसा ब्रह्मज्ञानमिसें । आळस अंतरीं प्रवेशे । म्हणे साधनाचें पिसें । काय करावें ॥ [ किं करोमि क्व गच्छामि किं गृह्णामि त्यजामि किम् । आत्मना पूरितं सर्वं महाकल्पांबुना यथा ॥** — दासबोध ]). म्हणून श्रीकृष्ण श्रीमद्भगवद्गीतेच्या सहाव्या अध्यायांतील ४६ व्या श्लोकांत अर्जुनास

---

सत्पुरुषांमध्यें ज्ञानाच्या दृष्टीनें कोणताही कमी-अधिकपणा असत नाहीं. पण साधकाचे दृष्टीनें पाहतां शेवटची जी अवस्था वर्णन केली त्या अवस्थेंत असणारे सत्पुरुषच त्यास उपयोगी पडतात. कारण, असे सत्पुरुषच सत्शिष्यास योग्य मार्ग दाखविण्यास व त्यावर कृपा करून त्यास आत्मसाक्षात्कार करून देण्यास समर्थ असतात. असे शब्दज्ञानांत पारंगत व अपरोक्ष साक्षात्कारी सद्गुरु भेटणें फार विरळा ! ”

संत हे बाल, पिशाच, उन्मत्त अशा निरनिराळ्या वृत्तीनें कसे जगतांत संचार करतात, तें पुढील संतवचनें स्पष्ट सांगत आहेत —

“ **कोणी उदास वनवासिच खेळ खेळे । कोणीहि कर्मरत आश्रमधर्म केले । स्वच्छंदता रमत एक विकल्प गेला । अद्वैत-बोध-पदनिश्चय पूर्ण झाला ॥ कोणी पिशाचवत अखंडित राजभद्री । भिक्षू उदासिन अकिंचन हो दरिद्री । संकल्पशून्य मग न आग्रहिं भाव ठेला । अद्वैतबोध-पदनिश्चय पूर्ण झाला ॥** ”

— ( रंगनाथस्वामी. )

“ **संतांचे दुर्गुण टाकुनि । श्रेष्ठचि गुण घ्यावा ॥ ध्रु० ॥ सुमनीं सुवास येतो मोठा । शेवंती सर्वांगासि कांटा ॥ १ ॥ दीपा अंगीं अवगुण असती । प्रकाश होतां अवघे न दिसती ॥ २ ॥ द्वाड वनिता हे रूपवती । कामुक पुरुषा प्रियकर होती ॥ ३ ॥ धनाचि मोट ओझें भारी । केवीं त्यागिति नर संसारीं ॥ ४ ॥ समुद्र क्षार न शमवी तहान । पुण्यासाठीं करणें स्नान ॥ ५ ॥ हिरा कठीण नव्हे अस्वार । लेइल्या होती तालेवार ॥ ६ ॥ क्रूर स्वभाविया रणशूर । त्याला अवश्य पाळी धूर ॥ ७ ॥ बाळ उन्मत्त पिशाच साधू । मात्रचि घ्यावा ब्रह्मबोधु ॥ ८ ॥ सोहिरा म्हणे ग्राहक ज्याचा । तोचि संग्रह करील त्याचा ॥ ९ ॥** ”

— ( सोहिरोबानाथ. )

“ **एक ज्ञान पावोनि जाहला पिसा । पडिला अव्यवस्था ठसा । नोळखेचि सच्छिष्याची दशा । योग्य उपदेशा तो नव्हे ॥ एक ज्ञान आश्चर्यें कोंदला ।**

'तूं योगी हो' असेंच सांगतात. या श्लोकाच्या टीकेंत श्रीवामनपंडित म्हणतात —

**"तरी निष्कामाचें फळ। आत्मज्ञान केवळ। मागुती तेथें चित्त करणें निश्चल। तो योग॥ एवं ज्ञानियाहीहुनी। योगी अधिक म्हणोनी। यास्तव म्हणतों कृपेंकरुनी। कीं तूं योगी होईं अर्जुना!॥ कीं तुज आत्मज्ञान। होईल मग आपुलें मन। स्वरूपरूप करूनि, मोहन। मोडी देहात्मतेचें॥"** —(यथार्थदीपिका.)

"चित्ताचा नाश झाल्याशिवाय म्हणजे चित्तचैतन्य झाल्याशिवाय मोक्ष नाहीं असा सर्व शास्त्रांचा सिद्धांत आहे. चित्तचैतन्य करण्याचे उपाय ज्यास

---

**विस्मयें तटस्थ होऊनि ठेला। काष्ठलोष्ठाचे परी पडला। नाहीं उरला उपदेशा॥ एक ज्ञान पावोनि अति कृपण। जीव गेलिया न बोले जाण। भेणें येणें धरोनि मौन। न बोले वचन सर्वथा॥ ज्यासी धनकोडी जोडी जाहली। ते पुरूनि वरी दगड घाली। दान न देतां वृथा गेली। संपत्ति केली भुविसवती॥ तैसें कष्टीं जोडूनि निजज्ञान। सत्पात्रीं न करीच दान। हें ज्ञात्याचें कृपण लक्षण। वंचकपणें स्वभावें॥"** —(एकनाथ महाराज.)

वरील उताऱ्यांत श्रीएकनाथ महाराजांनीं वर्णिलेले ज्ञानी जगतास कसे उपयोगी पडत नाहींत तें श्रीरंगनाथस्वामी योगवासिष्ठांतील पुढील उताऱ्यांत स्पष्टपणें सांगत आहेत —

**"ज्ञानी दुर्लभ संसारीं। सुलभाही आर्ति नुपजे पुरी। आर्ति जालियाही सहस्त्रांतरीं। एखादाची वरी साधूसी॥ ऐशिया साधूचें चित्त। केवळ आत्मसुखीं उद्यत। जालिया संसारपीडित। सत्वर शरणागत कोणा जाणें॥ ज्ञानियाचें जरी चित्त। सर्वदा होतें वस्तुगत। बाह्य पदार्थ नेणत। सुखसंवलित आत्मत्वें॥ तो निर्विकल्प समाधि। साधूंसि असतां निरवधि। केवल आत्मसुखैकाब्धीं। मनशुद्धि विसरोनि जाये॥ तेथें चालणें ना बोलणें। नाहीं व्युत्थान पाहणें। नाहीं कर्माचें करणें। आपणेविण न देखे॥ ऐसे सर्वदा समाधिस्थ। निरंतर राहते जरी संत। तरी लोक जे अज्ञानवृत्त। शरणांगत कोणासी जाते॥"**

—(रंगनाथस्वामी.)

'योग' म्हणतात ( **योग उपायास म्हणती** ।— यथार्थदीपिका ) ते दोन आहेत. चित्तवृत्तीचा निरोध करणें हा एक, ज्यास निर्विशेष, निर्विकल्प किंवा ज्ञानयोग म्हणतात व ब्रह्म सर्वत्र पाहणें हा दुसरा, ज्यास सविशेष, सविकल्प किंवा भक्तियोग असें म्हणतात. नुसती निर्गुणोपासना साकारीं जडत्वभावना उपजविते, म्हणून द्विविध योग अभ्यासिल्यावांचून पूर्वसंस्कार मोडत नाहींत. याकरितां सगुणभक्त जे ज्ञानी ते निर्विकल्प योग जाणूनही सगुणाची उपासना करतात. श्रीभगवद्गीतेंत 'अक्षर' पदें निर्विकल्पयोग बोधून 'अव्यक्त' शब्दें सविकल्पयोग सांगितला आहे. सविकल्पयोग म्हणजे जड जग सच्चिद्रूप पाहणें. ज्याप्रमाणें अलंकार सुवर्णरूप पाहणें, अर्थात् कनकाच्या ठिकाणीं दृष्टि दिल्यावर नग पाहूनही आपणास कनक मात्र दिसतें तद्वत्.

आतां या सविकल्पयोगाचे जाणते सगुणोपासकही असतात. दोघांत भेद तो हाच कीं, निर्गुणोपासकांस विश्वाकार हा मायामय अर्थात् भासरूप असल्यामुळें त्याज्य आहे व सगुणोपासकांस सर्व जग जगन्निवासच असल्यामुळें तो त्याज्य नाहीं. हा भेद यथार्थदीपिकेंत पुढीलप्रमाणें दाखविला आहे—

**"तंतु सत्य मिथ्या पट । माती सत्य मिथ्या घट । आत्माच आहे निपट । परी भास मिथ्या ते योगी मानिती ॥ भक्तयोगीहि हेंचि जाणे । परी त्यास विशेष एक बाणे । कीं हे ईश्वरकल्पना तेव्हां म्हणे । चराचर अवतार ईश्वराचे ॥ कीं मत्स्यकूर्मादि देह । भगवदवतार निःसंदेह । स्थिरचर तैसेंचि संदेह । काय एथें ॥"**

सगुण सर्वेश्वरास अशा प्रकारें भजणारा योगी सर्व योग्यांत थोर गणला जातो, असें श्रीभगवान् '**योगिनामपि सर्वेषां**' या श्रीगीताश्लोकांत स्पष्ट सांगतात. अशा प्रकारें सगुणसर्वेश्वराची अर्थात् सद्गुरूची सर्वात्मभावें जो सेवा करितो, त्याच्या अधीन सर्वस्वें त्या रूपानें श्रीभगवान् राहतो; म्हणजे त्याच्या ज्ञानाचा परिपाक होऊन तो स्थितप्रज्ञ होतो."—(पुरुषार्थदीपिका.)

या श्रीगुरुदेवभक्तीचें रहस्य श्रीवामनपंडितांच्या ' नामसुधे ' तील पुढील श्लोकांत सांपडतें —

" गुरुमुखें कळली स्वचिदात्मता, तदुपरांतिक जो गुरुदेवता ।
उभयभक्ति निजात्मपणें करी, सकळ होय कृपा गुरुची तरी ॥
आत्मानात्मविवेक मात्र गुरुच्या तेव्हां कृपेनें कळे ।
जीवेशैक्य उपाधितें निरसितां शिष्यास तें आकळे ।
देवीं आत्मगत प्रियत्व उमजे तैसें गुरूचे स्थळीं ।
ऐसी भक्ति करीत चित्तलहरी तेव्हां मुरे चिज्जळीं ॥
चित्ताची लहरी चिदंबुधिजळीं त्याची मुरे जेधवां ।
चैतन्यास जडांत तंतु वसनीं देखे असें तेधवां ।
ज्ञानाचा परिपाक होय, परि हे सर्वात्मभावीं जयीं ।
भक्ति श्रीगुरुदेवपादकमळीं याची ठसावे तयीं ॥ "

श्रीएकनाथ महाराजांनीं पुढील ओंव्यांत सद्‌गुरूचें खरें स्वरूप वर्णन करून त्याची महती गाइली आहे —

" यालागीं गुरुभजनापरता । धर्म नाहीं जाण सर्वथा । ऐसें बोलिला जगत्पिता । म्हणोनि तत्त्वतां सद्गुरूचि ब्रह्म ॥ परी अभाग्य जन जे असती । ते मनुष्याकारें मनुष्य मानिती । व्यक्तिसाठीं परमार्थ हरविती । अढळ भ्रांति दृढ झाली ॥ अहो भ्रमें करुनियां मनुष्याकार । जऱ्ही दिसे साकार । तरी तें ब्रह्म निर्विकार । नाहीं विचार आन येथें ॥ जैसी जळाची जळगार । गोठोनि जाली जऱ्ही साकार । तऱ्ही साकारत्वें निर्विकार । नाहीं विचार आन कांहीं ॥ जऱ्ही ते विराली न विराली । तऱ्ही ते जळरूपेंचि स्थिरावली । तैसी सद्गुरुमूर्ति साकारली । ते ब्रह्मावेगळी कैसी बोलावी ॥ नाना सुवर्णाचें पेंडुकें केलें । तऱ्ही पाषाणपणा नाहीं आलें । तैसें सद्गुरुरूप साकारलें । नये बोलों बोलें मनुष्यपणा ॥ ना शर्करेचा पुरुष केला । नाना अवयवीं विस्तारला । तऱ्ही तो काये साखरपणा टाकूनि गेला । असे संचला शर्करारूपें ॥ तेथें नामरूपाचीच मिरवणी । नाहीं आन शर्करेवांचुनि । तैसा सद्गुरु निर्वाणीं । सगुणपणीं शोभतु ॥ आणि जगचि ब्रह्म असे जेथ । तेथ सद्गुरु नव्हे काय निमित्त । यालागीं

गुरुचि ब्रह्म सदोदित । लोक भ्रांत ते न मानिती ॥ असो जनाची जनमती । मजलागीं सद्गुरूचि ब्रह्ममूर्ति । जे तद्वाक्यें बोधले असती । तेचि देखती ब्रह्मत्वें गुरु ॥ जयांसि जो बोध झाला । स्वयें ब्रह्मभाव नाहीं बाणला । ते काय जाणती सद्गुरूला । नाहीं मोडला भ्रांति फाटा ॥ असो त्यांचें काय काय बोलावें । सद्गुरु परब्रह्मचि स्वभावें । अंधासि सूर्य सूर्यत्वें न भावे । तऱ्ही काये सूर्य नव्हे जनासि या ॥ नेणोनि परीसासि पाषाण मानी । तो टाकूनि देतो उपेक्षुनी । तऱ्ही तो काये परीसपणा पासुनी । जाय उठोनि देशांतरा ॥ तैसा गुरु ब्रह्मत्वें न मानिती । तऱ्ही ब्रह्मीं ब्रह्मत्वें ते व्यक्ति । त्याचे दर्शनमात्रेंचि ब्रह्मप्राप्ति । दिव्य लोकांप्रति देईन मी ॥ माझे दिव्य सद्गुरूचरण । त्याचें केलें म्यां स्पर्शन । तें दिव्याचें दिव्य संपूर्ण । नाहीं आन सर्वथा ॥ यालागीं साक्षात् ब्रह्ममूर्ति । सद्गुरु होय निश्चितार्थी । त्याचे दर्शनमात्रेंचि नाशती । चिदचिद्ग्रंथी संशय कर्मे ॥ इतुकिया-लागीं निरूपण । साधूनी सद्गुरूसि ब्रह्मपण । सर्व लाभे तद्दर्शनें-करून । श्रुत्यर्थें पूर्ण ठेविलें ॥ ”

भागवतांतील पुढील उताऱ्यांत श्रीएकनाथ महाराजांनीं —

‘निर्विकल्पीं जे आनंदप्राप्ती । तेचि सद्गुरुवर्णनीं वर्ते स्थिती ।’ असें सांगून ‘मुख्य समाधि गुरुभजन’ असाच सिद्धांत पुढें केला आहे —

“एक निर्विकल्प समाधी । जे कीं निरीह स्थिति निरवधी । तैणेंचि राहावें परमानंदीं । तेचि अवधि परमसुखाची ॥ तेसें न करितां समाधान । करावें सद्गुरूचें वर्णन । वाखाणावें ऐश्वर्य पूर्ण । हेंचि समाधान निर्विकल्प ॥ निर्विकल्पीं जे आनंदप्राप्ती । तेचि सद्गुरूवर्णनीं वर्ते स्थिती । याहूनि येथें सुखोपायगती । प्रयास न लगती योगाचे ॥ योगाचेनि बळेंकरून । करावें निर्विकल्प समाधान । निरोधोनि इंद्रियादि मन । स्वरूपस्थ पूर्ण करावें ॥ हे सर्व न करितां आटाआटी । मनोवृत्ति न करोनि उफराटी । सद्गुरूदर्शनेंचि सुखकोटी । वर्णनीं भेटी परमानंदाची ॥ सद्गुरूचें ऐश्वर्य वर्णितां । लाभे आपुली निजात्मता । नलगे त्यजणें इंद्रियार्था । इंद्रियें सर्वथा कोंडणे नलगे ॥ अहो

सर्वत्र असे जें सर्वपणें । त्यालागीं कासया समाधि करणें । उघड्या नेत्रींच भोगणें । नलगे घालणें आसनादिक ॥ जे सर्वत्र स्वरूप न देखती । जे स्वयें ब्रह्म जाले नसती । साधकपणें आपण देखती । तयांसि प्राप्ति समाधि साधनें ॥ अथवा सर्व जिहीं ब्रह्म देखिलें । स्वयें ब्रह्म असती जाले । परी दुःखदर्शनासि भ्याले । म्हणोनि निराळे निर्विकल्पें ॥ येरव्हीं सर्वत्र जैं ब्रह्म देखती । स्वयेंहि ब्रह्म जाले असती । तैं सविकल्पें निर्विकल्पें राहाती । किंचिदर्थीं नव्हती न्यून ॥ ब्रह्मचि स्वयें जाले आपण । तेथ ब्रह्माहूनि अधिक कोण । ब्रह्म ब्रह्मोसि तरी नव्हे न्यून । तें परिपूर्ण सर्वावस्था ॥ यालागीं जे जे अवस्थे राहिजे । ते ते ब्रह्मत्वेंचि असिजे । तेथें न्यूनाधिक काय बोलिजे । ब्रह्माचि सहजें नित्यरूपें ॥ यालागीं तो निर्विकल्प असो । अथवा सत्कर्माचरणीं वसो । सविकल्पें अथवा उगाचि बैसो । परी गुरुभजनीं पैसो बुद्धि त्याची ॥ तऱ्ही हाचि हा सर्वत्र आपण । करणीं अकरणीं नव्हे न्यून । म्हणोनि मुख्य समाधि गुरुभजन । तेंचि आपण सर्वदा करी ॥ ”

पुढील उतारे वरील श्रीएकनाथी भागवतांतील उताऱ्याला पुष्टि देणारे असेच असल्यामुळें येथें सादर केले आहेत —

“ यालागीं गुरुरूप जो मी असें । तयाचें अर्चन वंदन सुगम ऐसें । तैसेंचि परमप्रेमें करूनी सर्वस्वें । युक्तस्वभावें होऊनियां ॥ मग निरंतर मातेंचि भजती । सर्व प्रतिबंध नाहीं जयाप्रती । सर्वभावें सद्गुरूस शरण जाती । तेचि सर्वार्थी मीचि जाणा ॥ ”

— ( रंगनाथस्वामी. )

“ सद्गुरूचें निजनामचि एक । निवारी बाधा महादोख । वैराग्य उपजवी अलौलिक । तेणें होय निजसुख साधकां ॥ ”

— ( एकनाथ महाराज. )

“ जे सद्गुरूचें नाम जपती । नाम त्या देतें मुक्ती । मोक्ष रोकडा त्यांचे हातीं । नाम देतें हे सत्य ॥ ” — ( नारायण महाराज. )

**" तुझें श्रवण दोंपरी । एक तें चित्तशुद्धी करी । दुसरें जीवाशिवा ऐक्य करी । दोहींपरी उद्धारु ॥ चित्तशुद्धीसी कारण । प्रेमयुक्त कीर्तिश्रवण । येथ सच्छ्रद्धाचि प्रमाण । अकारण साधनें ॥ "**

— ( एकनाथ महाराज. )

'**ज्ञानपरिपाकाचें सुगम साधन**' या १३ व्या मथळ्याखालीं गुरु-भजनानें साधकास पक्वदशा सत्वर प्राप्त होऊन तो स्थितप्रज्ञ किंवा जीवन्मुक्त होतो, हें अनेक संतवचनद्वारां मागें सिद्ध करून दाखविण्यांत आलेंच आहे. तथापि साधकांच्या दृष्टीनें हा विषय अत्यंत महत्त्वाचा असल्याकारणानें त्याचा विशेष खुलासा होणें इष्ट वाटल्यावरून तसा तो वर करण्यांत आला आहे आणि त्याबद्दल वाचकवर्ग रागावणार नाहीं, अशी खात्री वाटते.

समाधीचे विविध प्रकारांसंबंधीं आतांपावेतों चांगलाच खुलासा झाला आहे. 'योगवासिष्ठांतील तत्त्वज्ञान' या ग्रंथांत वे. शा. सं. पावगीशास्त्री यांनीं समाधीसंबंधीं जे विचार प्रगट केले आहेत ते ध्यानांत धरण्या-सारखे असून, शास्त्रीबुवा त्यासंबंधींचें स्पष्टीकरण करतांना म्हणतात —

" वसिष्ठांच्या मतें एखादा मनुष्य पद्मासन घालून बसलेला असला व त्यानें ब्रह्मांजलि केलेली असून बाह्यात्कारी समाधि लावून बसल्यासारखा दिसत असला ; पण त्याचें चित्त शांत व स्थिर झालेलें नसेल, तर त्याची ती समाधि आहे, असें म्हणतां येणार नाहीं. "

फार कशाला ! आमच्याच परंपरेंतील इंदूर येथील सद्गुरु श्रीलक्ष्मण महाराज वेलणकर यांचे शिष्य ( अर्थात् आद्यसद्गुरु श्रीनारायण महाराज जालवणकर यांचे प्रशिष्य ) श्रीबलभीमबोवा साडेकर यांनीं समाधीची व्याख्या देतांना जे महत्त्वाचे विचार प्रगट केले आहेत, ते ध्यानांत धरण्यासारखे आहेत. महाराज म्हणतात —

" जागृतीच्या अंतीं आणि निद्रेच्या आदि* जी स्थिति ती संधिगत

---

* निद्रादौ जागरस्यांते यो भाव उपजायते ।
तं भावं भावयन् साक्षादक्षयानंदमश्नुते ॥ — योगवासिष्ठ

अवस्था होय. लय, विक्षेप, ताटस्थ्य, मूर्च्छा वगैरे वृत्तीच्या अवस्था आहेत. **समाधि याचा खरा अर्थ समतोल बुद्धि. अहंकाराचा लेश न राहतां आनंद, समाधान सर्वदा असणें या नांव समाधि.** "

वास्तविक, गुरुभक्तांनीं समाधीच्या कोणत्याही खटाटोपींत न पडतां केवळ श्रीगुरुचरणीं सर्व भार टाकून स्वस्थ राहिल्यानें परमार्थांत सर्व कांहीं साधतें असा गुरुभक्तांचा प्रत्यक्ष अनुभव असून, श्रीएकनाथ महाराजांसारखे परमगुरुभक्त यासंबंधीं काय म्हणतात पाहा —

**" हे सर्व न करितां आटाआटी । मनोवृत्ति न करोनि उफराटी ।**
**सद्गुरुदर्शनेंचि सुखकोटी । वर्णनीं भेटी परमानंदाची ॥**
**सद्गुरुचें ऐश्वर्य वर्णितां । लाभे आपुली निजात्मता ।**
**नलगे त्यजणें इंद्रियार्थां । इंद्रियें सर्वथा कोंडणें न लगे ॥**
**यालागीं तो निर्विकल्प असो । अथवा सत्कर्माचरणीं वसो ।**
**सविकल्पें अथवा उगाचि बैसो । परी गुरुभजनीं पैसो बुद्धि त्याची ॥**
**तर्‍ही हाचि हा सर्वत्र आपण । करणीं अकरणीं नव्हे न्यून ।**
**म्हणोनि मुख्य समाधि गुरुभजन । तेंचि आपण सर्वदा करी ॥ "**

असो. याकरितां '[redacted]'तील पुढील प्रेमखूणप्राप्त्यर्थ केलेली प्रार्थना श्रीसद्गुरूंच्या दिव्यचरणीं पुन्हा एकवार सादर करून तेथेंच विलीन होतों —

**" कां रे शिणसी व्यर्थाचि बापा । वृत्ति ही मुरण्या ॥ध्रु०॥**
**उगाच बैसुनि लावीं चित्ता । गुरुचरणीं रमण्या ॥ १ ॥**
**हेंहि सुलभ कृपेनें त्याच्या । लागसि गुण गाण्या ॥ २ ॥**
**गातां गातां विलंब नच तुज । देहातीत होण्या ॥ ३ ॥**
**ऐसें जाहल्या शिण मग कैंचा । प्रेमखूण मिळण्या ॥ ४ ॥ "**

॥ श्रीसद्गुरुचरणार्पणमस्तु ॥

# मराठी पुस्तकें

## गुरुवर्य श्रीरामचंद्र शंकर टाकी ऊर्फ श्रीभाईकृत :—

| | | |
|---|---|---|
| पुरुषार्थदीपिका पृ. सं. ७०९ | रु. | ३—०—० |
| श्रीज्ञानेश्वर महाराजांचें चरित्र | ,, | १—८—० |
| सद्भक्तिपंथ | ,, | ०—४—० |
| जगद्वंद्यपंथ—प्रदर्शक श्लोकद्वय | ,, | ०—३—० |
| श्रीनारायण महाराज जालवणकर यांचें त्रोटक चरित्र | ,, | ०—२—० |
| श्रीशंकरसुधा | ,, | २—०—० |
| भगवद्भजन ( आठवी आवृत्ति ) | ,, | १—४—० |

## आद्यसद्गुरु श्रीनारायण महाराज जालवणकरकृत :—

| | | |
|---|---|---|
| बोधसागर | रु. | ०—६—० |
| कैवल्यसागर | ,, | ०—१२—० |
| ज्ञानसागर | ,, | १—८—० |
| विज्ञानसागर | ,, | ०—१२—० |
| आनंदसागर | ,, | २—०—० |
| शांतिसागर | ,, | २—०—० |
| करुणासागर ( पूर्वार्ध ) | ,, | २—८—० |
| करुणासागर ( उत्तरार्ध... प्रथम—भाग ) | ,, | ३—०—० |

## श्रीमंगेश रामचंद्र टाकी ऊर्फ श्रीदादाभाईकृत :—

| | | |
|---|---|---|
| श्रीकृष्णांचे सद्गुरु श्रीदुर्वास ! | रु. | ०—८—० |
| आचार्यचतुष्टय | ,, | ०—१२—० |
| श्रीशिवछत्रपतींचें वैराग्य | ,, | ०—६—० |
| श्रीगीताध्याय—सारामृत ( अध्याय १—६ ) | ,, | २—०—० |
| श्रीतुकाराम महाराजांचें सदेह-श्रीवैकुंठगमन | ,, | ३—०—० |
| प्रारब्ध-कर्मांचें सांगोपांग विवेचन | ,, | १—०—० |

# इतर मराठी पुस्तकें

| | | |
|---|---|---|
| प्रतिष्ठान-चरित्र अथवा श्रीएकनाथ महाराजांचें ओंवीबद्ध चरित्र | रु. | ३—०—० |
| श्रीसोहिरोबानाथांचा कविता-संग्रह | ,, | २—८—० |
| श्रीशांतादुर्गा संस्थानचा संक्षिप्त इतिहास | ,, | १—०—० |
| गोमांतकांतील गौड सारस्वत ब्राह्मण आणि त्यांचे कुलदेव | ,, | १—४—० |
| श्रीमांगिरीश-स्तवराज | ,, | ०—४—० |
| श्रीमांगिरीश-शांतादुर्गाख्यान | ,, | ०—४—० |

## English Books by Shri R. S. Taki ( Shri Bhai )

| | | | |
|---|---|---|---|
| Amourism | ( Paper Bound ) | Rs. | 2—0—0 |
| ,, | ( Cloth Bound ) | ,, | 3—0—0 |
| De Carmine Dei Deorum or On the Song of the God of Gods (A Commentary on the Bhagavad-Gita) | | ,, | 7—0—0 |
| Religion of Mankind | | ,, | 0—2—0 |
| World Religion | | ,, | 0—4—0 |
| A National Prayer | | ,, | 0—2—0 |
| A Comparison between the path of Eternal Religion and Eternal Love | | ,, | 0—2—0 |

## 'सद्भक्ति-प्रकाश'

हें नियतकालिक तीन महिन्यांनीं प्रसिद्ध होतें. यांत भक्ति-ज्ञान-वैराग्य परिपोषक असेच विषय येत असतात. वर्षारंभ विजयादशमीस ( अक्टोबर ). वार्षिक वर्गणी ( टपाल हंशिलासह ) रु. ३—३—०.

**वरील पुस्तकें खालील ठिकाणीं मिळतील :—**

( १ ) सद्भक्ति-प्रसारक-मंडळी, श्रीशंकर लॉज, सरस्वती बाग, जोगेश्वरी, मुंबई.
( २ ) पॉप्युलर बुक डेपो, लॅमिंग्टन रोड, मुंबई ७
( ३ ) बॉंबे बुक डेपो, चर्नीरोड, मुंबई ४